शासकीय व अशासकीय अनुदानित, विनाअनुदानित व कायम विनाअनुदानित अध्यापक महाविद्यालयातील नियमित बी.एड. अभ्यासक्रमासाठीच्या सन २०१५-२०१६ या शैक्षणिक वर्षासाठी शिक्षण शुल्क व प्रवेश पद्धती याबाबतची नियमावली.

महाराष्ट्र शासन

उच्च व तंत्र शिक्षण विभाग

**शासन निर्णय क्रमांकः बीएड-४६१५/प्र. क्र.७०/१५/मशि-२**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

तारीखः ६ जून, २०१५.

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांकः एनजीसी २००४/(४१/०४/मशि-३, दिनांक १६ फेब्रुवारी, २००४.

२) शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक : उशिसं/बी.एड. सी.ई.टी./ २०१५-२०१६/बी.एड./४०७६, दिनांक २४.४.२०१५.

**शासन निर्णय:-**

सन २०१५-१६ या शैक्षणिक वर्षासाठी बी. एड. (पूर्णवेळ, नियमित) अभ्यासक्रमास प्रवेश घेण्यासाठी नियमावली विहित करण्याबाबतचा प्रस्ताव संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दिनांक २४.०४.२०१५ च्या पत्रान्वये सादर केला आहे. सदर प्रस्तावास अनुसरुन पुढील बी. एड. अभ्यासक्रम प्रवेश नियमावलीस शासन मान्यता देण्यात येत आहे.

**बी.एड. प्रवेश : शैक्षणिक वर्ष ५-२०१६.**

| | | | |
|---|---|---|---|
| १ | प्रवेश प्रक्रियेची कार्यपध्दती:- | | |
| | १.१ | | महाराष्ट्रातील शासकीय, अशासकीय अनुदानित, अशासकीय विनाअनुदानित/कायम विनाअनुदानित व अल्पसंख्यांक संस्था संचलित अनुदानित, विनाअनुदानित व कायम विनाअनुदानित शिक्षणशास्त्र महाविद्यालयांमध्ये नियमित बी.एड. अभ्यासक्रमासाठी द्यावयाचे प्रवेश सामाईक प्रवेश परीक्षा (Common Entrance Test ) (CET) घेऊन केंद्रीय प्रवेश प्रक्रियेव्दारे (Govt. Common Admission Process)(Govt. CAP) करण्यात येतील.<br>सदर प्रवेश प्रक्रियेची कार्यवाही संगणकामार्फत Online पध्दतीने करण्यात येणार आहे. |
| | १.२ | भरावयाच्या जागा :- | |
| | | या परीक्षेतून खालीलप्रमाणे जागा भरण्यात येतील:- | |

| | | | |
|---|---|---|---|
| | | अ) | शासकीय व अशासकीय अनुदानित/ विनाअनुदानित/कायम विनाअनुदानित महाविद्यालये:- १०० % |
| | | ब) | १) अशासकीय अनुदानित अल्पसंख्यांक महाविद्यालये : ५० %<br>२) शासकीय केंद्रीय प्रवेश प्रक्रियेत सहभागी अशासकीय विना अनुदानित/ कायम विना अनुदानित अल्पसंख्यांक महाविद्यालये : ४९ % |
| | | क) | अनुदानित अल्पसंख्यांक महाविद्यालयांनी भरावयाच्या ५० टक्के जागा दिनांक १६ फेब्रुवारी, २००४ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार केंद्रीय प्रवेश प्रक्रियेतील वर्ष २०१५-१६ च्या सीईटी उत्तीर्ण उमेदवारांतूनच गुणवत्तेनुसार प्राधान्यक्रमाने व बी.एड प्रवेश नियमांचे पालन करुन संबंधित अल्पसंख्यांक उमेदवारांमधूनच गुणवत्तेनुसार प्राधान्यक्रमाने भरणे अनिवार्य राहील. प्रवेश प्रक्रिया पार पाडताना संबधित अल्पसंख्यांक महाविद्यालयांनी खालीलप्रमाणे कार्यवाही करावी :-<br>(१) प्रवेशित उमेदवारांना संबंधित महाविद्यालयाने त्यांच्या Login ID मधून प्रवेशपत्र काढून देणे आवश्यक राहील.<br>(२) अल्पसंख्यांक कोटयांतर्गत प्रवेशित उमेदवारांची यादी केंद्रीय प्रवेश प्रक्रियेमार्फत प्रमाणित करुन घेणे आवश्यक राहील.<br>(३) संस्था अल्पसंख्यांक कोटा घेऊ इच्छित नसलयास त्या जागा संस्थेला केंद्रीय प्रवेश प्रक्रियेकडे अल्पसंख्यांक आयोगाचे ना-हरकत प्रमाणपत्र सादर करुन समर्पित कराव्या लागतील. त्यावर वरील १.२(ब) येथील प्रमाणानुसार जागा भरण्यात येतील.<br>(४) ज्या अल्पसंख्यांक संस्थेला अल्पसंख्यांक कोटा समर्पित करावयाचा आहे व त्या संस्थेस जर अल्पसंख्यांक कोटयाऐवजी सर्वसाधारण कोटा हवा असल्यास संस्थेस त्यांच्या महाविद्यालयात घटनात्मक आरक्षणानुसार पदभरती करायला हवी व विद्यार्थीसुध्दा घटनात्मक आरक्षणानुसार स्विकारणे बंधनकारक राहील.<br>(५) केंद्रीय प्रवेश प्रक्रियेव्दारा अल्पसंख्यांक महाविद्यालयाला पुरेसे उमेदवार उपलब्ध न झाल्यास, संस्थास्तरावर गुणवत्तेनुसार उमेदवार भरता येतील. |
| | | ड) | केंद्रीय प्रवेश प्रक्रियेत सहभागी अशासकीय विनाअनुदानित आणि कायम विनाअनुदानित अल्पसंख्यांक अध्यापक महाविद्यालयांना अल्पसंख्यांक कोटा केंद्रीय प्रवेश प्रक्रिया (Govt. CAP) अथवा महाराष्ट्र विनाअनुदान अध्यापक महाविद्यालय संस्था चालक असोसिएशन (Asso. CAP) यापैकी एकाच CAP मधून भरता येईल. दोन्ही CAP मधून एकत्रित भरता |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | येणार नाही. तथापि शासनाची व असोशिएशनची प्रवेश प्रक्रिया संपल्यानंतर जागा रिक्त असल्यास जर शासकीय केंद्रीय प्रवेश प्रक्रियेतील (Govt. CET) महाविद्यालयांना महाराष्ट्र विनाअनुदानित अध्यापक महाविद्यालय संस्थाचालक असोशिएशनाच्या सामाईक परीक्षेतून (Asso. CET) पात्र शिल्लक उमेदवारांतून प्रवेश द्यावयाचे असतील किंवा (Asso. CET) मधील महाविद्यालयांना (Govt.CET) तून पात्र शिल्लक उमेदवारांतून प्रवेश द्यावयाचे असतील तर उच्च शिक्षण संचालनालयाची पुर्वपरवानगी घेणे आवश्यक राहील. प्रवेश प्रक्रिया पार पाडताना संबंधित अल्पसंख्यांक महाविद्यालयांनी खालील प्रमाणे कार्यवाही करावी:-<br>(१) ज्या विनाअनुदानित, कायम विनाअनुदानित अल्पसंख्यांक अध्यापक महाविद्यालयाने केंद्रीय प्रवेश प्रक्रिये (CAP) मधून अल्पसंख्यांक कोटा भरला आहे त्या महाविद्यालयाने प्रवेशित उमेदवारांना Login ID मधून प्रवेशपत्र काढून देणे आवश्यक राहील.<br>(२) अल्पसंख्यांक कोटयांतर्गत प्रवेशित उमेदवारांची यादी केंद्रीय प्रवेश प्रक्रियेद्वारा प्रमाणित करुन घेणे आवश्यक राहील.<br>(३) केंद्रीय प्रवेश प्रक्रियेत सहभागी अशासकीय विनाअनुदानित/कायम विनाअनुदानित अल्पसंख्यांक अध्यापक महाविद्यालयाने महाराष्ट्र विनाअनुदानित अध्यापक महाविद्यालय संस्थाचालक असोसिएशनमार्फत अल्पसंख्यांक कोटा भरला असेल तर अल्पसंख्यांक कोटयांतर्गत प्रवेशित उमेदवारांची यादी महाराष्ट्र विनाअनुदानित अध्यापक महाविद्यालय संस्थाचालक असोसिएशन तसेच प्रवेश नियंत्रण समितीकडून मान्य करुन घेणे अनिवार्य राहील.<br>(४) संस्था अल्पसंख्यांक कोटा घेऊ इच्छित नसल्यास त्या जागा संस्थेला केंद्रीय प्रवेश प्रक्रियेकडे अल्पसंख्यांक आयोगाचे ना-हरकत प्रमाणपत्र सादर करुन समर्पित कराव्या लागतील. त्यावर वरील १.२(ब) येथील प्रमाणानुसार जागा भरण्यात येतील.<br>(५) ज्या अल्पसंख्यांक संस्थेला कोटा समर्पित करावयाचा आहे व त्या संस्थेस जर अल्पसंख्यांक कोटयाऐवजी सर्वसाधारण कोटा हवा असल्यास संस्थेस त्यांच्या महाविद्यालयात घटनात्मक आरक्षणानुसार पदभरती करायला हवी व विद्यार्थीसुध्दा घटनात्मक आरक्षणानुसार स्विकारणे बंधनकारक राहील.<br>(६) अल्पसंख्यांक कोटयांअतर्गत केंद्रीय प्रवेश प्रक्रियेव्दारा पुरेसे उमेदवार उपलब्ध न झाल्यास संस्थास्तरावर गुणवत्तेव्दारे उमेदवार भरता येतील. |

| | | | |
|---|---|---|---|
| | | इ) | महाराष्ट्र विनाअनुदानित अध्यापक महाविद्यालय संस्थाचालक असोसिएशनचे सदस्य असलेल्या अशासकीय विनाअनुदानित व कायम विनाअनुदानित शिक्षणशास्त्र महाविद्यालयात संघटनेमार्फत घेतलेली त्या त्या वर्षाची सामाईक परीक्षा (Asso. CET) व (Asso. CAP) द्वारे एक खिडकी योजनेंतर्गत (Single Window System) प्रवेश होणे बंधनकारक राहील. तथापि, शासनाची व असोशिएशनची प्रवेश प्रक्रिया संपल्यानंतर रागा रिक्त असल्यास शासकीय केंद्रीय प्रवेश प्रक्रियेतील (Govt. CET) मधील महाविद्यालयांना महाराष्ट्र विनाअनुदानित अध्यापक महाविद्यालय संस्थाचालक असोसिएशनच्या सामाईक परीक्षेतून (Asso. CET) तील पात्र शिल्लक उमेदवारांतून प्रवेश द्यावयाचे असतील, किंवा (Asso. CET) मधील महाविद्यालयांना (Govt. CET) मधून पात्र शिल्लक उमेदवारांमधून प्रवेश द्यावयाचे असतील, तर उच्च शिक्षण संचालनालयाची पुर्व परवानगी घेणे आवश्यक राहील. महाराष्ट्र विनाअनुदान अध्यापक महाविद्यालय संस्थाचालक असोशिएशनकडून शासकीय केंद्रीय प्रवेश प्रक्रियेतील (Govt. CET) विद्यार्थी Association CAP मध्ये प्रवेशित करावयाचे असल्यास उच्च शिक्षण संचालनालयाची पूर्वपरवानगी घेणे आवश्यक राहील. तसेच शासकीय केंद्रीय प्रवेश प्रक्रियेशी संलग्नित असणाऱ्या महाविद्यालयांना महाराष्ट्र विनाअनुदानित अध्यापक महाविद्यालय संस्थाचालक असोसिएशनच्या सामाईक परीक्षेतून (Asso. CET) उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांना Govt. CAP मधून प्रवेशित करावयाचे असल्यास संचालनालयाची पुर्वपरवानगी घेणे आवश्यक राहील. मा. सर्वोच्च न्यायालय/मा. उच्च न्यायालय/प्रवेश नियंत्रण समितीचे निर्णय/शासनाकडून वेळोवेळी प्रसिध्द करण्यात आलेले प्रचलित निर्णय व नियम बंधनकारक राहतील. महाविद्यालयात प्रवेशित उमेदवारांची यादी असोसिएशनद्वारा प्रमाणित करुन घेऊन नंतर प्रवेश नियंत्रण समितीकडून मान्य करुन घेणे बंधनकारक राहील. |
| २ | **केंद्रीय सामाईक परीक्षेसाठी (CET) पात्रता :** | | |
| | २.१ | अ) | (१) मान्यताप्राप्त विद्यापीठाच्या विज्ञान व गणित/सामाजिक शास्त्रे (इतिहास/भूगोल/अर्थशास्त्र/राज्यशास्त्र/मानसशास्त्र/तत्वज्ञान/शिक्षण/ग्रंथालय शास्त्र) तसेच मानव्यशास्त्रे (सर्वभाषा व साहित्य) विद्याशाखेची ३ वर्षाची पदवी/पदव्युत्तर अभ्यासक्रमा पूर्ण केला असेल व पदवी किंवा पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाला खुला संवर्गातील उमेदवाराला किमान ५० टक्के (४९.५० ते ४९.९९ टक्के पर्यंतचे गुणधारकांचे गुण ५० टक्के इतके गणण्यात येतील) व मागासवर्गीय संवर्गातील (अ.जा., अ.ज., वि.जा.भ.ज., इ.मा.व., व |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | वि.मा.प्र.) ज्या उमेदवारांना किमान ४५ टक्के गुण (४४.५० टक्के ते ४४.९९ टक्के पर्यंतचे गुण धारकांचे गुण ४५ टक्के इतके गणण्यात येतील.) महाराष्ट्राबाहेर विद्यापीठातील पदवी प्राप्त सर्व संवर्गातील ज्या उमेदवारांनी किमान ५० टक्के गुण प्राप्त केले आहेत (४९.५० ते ४९.९९ टक्के पर्यंतचे गुणधारकांचे गुण ५० टक्के इतके गणण्यात येतील) असे उमेदवार बी.एङ प्रवेशासाठी घेण्यात येणाऱ्या सामाईक प्रवेश परीक्षेस (CET) बसण्यास व बी.एड. प्रवेशास पात्र राहतील.<br>अभियांत्रिकी व तंत्रज्ञान मध्ये (गणित व विज्ञान विषय विशेष म्हणूनअसलेले) उमेदवार तसेच मान्यता प्राप्त विद्यापीठाच्या २.१ (अ) मधील सोडून इतर सर्व विद्याशाखांच्या पदव्या (उदा.वाणिज्य, व्यवस्थापन, अभियांत्रिकी, संगणक, विधी,माहिती तंत्रज्ञान, कृषि, बी.बी.आय., वैद्यकशास्त्र, समाजशास्त्रातील २.१ मध्ये नमूद केलेले विषय सोडून इतर विषय, फाईनआर्ट, परफॉर्मिंग आर्ट - संगीत/नृत्य/नाटय इ.) तसेच महाराष्ट्र शासनाने पदवी समकक्षता दिलेला कोणताही अभ्यासक्रम पूर्ण केला असेल व पदवीला किंवा पदव्युत्तर अभ्यासक्रमाला खुला संवर्गातील उमेदवाराला किमान ५५ टक्के गुण (५४.५० ते ५४.९९ टक्के पर्यतचे गुणधारकांचे गुण ५५ टक्के इतके गणण्यात येतील.) व मागासवर्गीय संवर्गातील (अ.जा. , अ.ज. , वि.जा.भ.ज. , इ.मा.व. , व वि.मा.प्र.) ज्या उमेदवारांना किमान ५० टक्के गुण (४९.५० टक्के ते ४९.९९ टक्के पर्यंतचे गुण धारकांचे गुण ५० टक्के इतके गणण्यात येतील.) महाराष्ट्राबाहेर विद्यापीठातील पदवी प्राप्त सर्व संवर्गातील ज्या उमेदवारांनी किमान ५५ टक्के गुण प्राप्त केले आहेत (५४.५० ते ५४.९९ टक्के पर्यंतचे गुणधारकांचे गुण ५५ टक्के इतके गणण्यात येतील) असे उमेदवार बी.एङ प्रवेशासाठी घेण्यात येणाऱ्या सामाईक प्रवेश परीक्षेस (CET) बसण्यास व बी.एड. प्रवेशास पात्र राहतील.<br>दोन वर्षाच्या किंवा एक वर्ष अभ्यासक्रमाची पदवी धारण करणारे पदवीधारक उमेदवार (मुक्त विद्यापीठातील पदवीप्राप्त उमेदवार वगळून) बी.एड. प्रवेशास पात्र राहणार नाहीत. यास महाराष्ट्र शासनाने पदवी समकक्षता दिलेले १/२ वर्षीय अभ्यासक्रम अपवाद राहतील. |
| | | | (२) ज्या विद्यापीठाच्या पदवी परीक्षेच्या गुणपत्रकात गुणांच्या ऐवजी श्रेणी (Grade) दिलेली असेल अशा उमेदवारांनी त्या त्या विद्यापीठाचे त्या श्रेणीशी (Grade) समकक्ष गुण प्रवेश अर्जात नोंदवावेत व प्रवेशाच्यावेळी समकक्ष गुण दर्शविणारे विद्यापीठ/महाविद्यालयाचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक आहे. तसेच विद्यापीठाच्या विषयांचे संकेतांक(Code No.) दिलेले असतील तर त्यांनी विषयांच्या संकेतांकाचा (Code No.) तक्ता प्रवेशाच्यावेळी सादर |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | करणे आवश्यक राहील. |
| | | | (३) उमेदवारांना पदवी परीक्षेच्या ज्या गुणांवर पदवी प्राप्त झाली आहे (विद्यापीठाने दिलेल्या अतिरिक्त गुणांची गणना करुन) त्या एकूण गुणांची टक्केवारी किमान पात्रतेसाठी व गुणवत्तेसाठी मुळ गुण ग्राह्य धरले जातील. (उदा.काही विद्यापीठांत तीन वर्षाचे गुण एकत्रित करुन पदवी दिली जाते, काही विद्यापीठात दोन वर्षाचे गुण एकत्रित करुन पदवी दिली जाते तर काही विद्यापीठात केवळ तृतीय वर्षाच्या गुणांवर पदवी दिली जाते.) विद्यापीठाने श्रेणी/वर्ग देण्यासाठी स्वीकारलेल्या पध्दतीनुसार पदवी गुणांची गणना करण्यात येईल. तसेच मुक्त विद्यापीठांच्या पदवीधरांच्या गुणांची गणना मुक्त विद्यापीठाने पदवीची श्रेणी प्रदान करण्यासाठी स्विकारलेल्या पध्दतीनुसार गुणांची गणना करण्यात येईल. |
| | | ब) | जे उमेदवार मार्च / एप्रिल २०१५ ला पदवीच्या अंतिम परीक्षेला बसलेले आहेत ते उमेदवार सामाईक प्रवेश परीक्षा (CET) देण्यास पात्र राहतील. महाविद्यालयाचा प्राधान्यक्रम भरण्याच्या कालावधीपर्यंत ज्या उमेदवारांच्या पदवी परीक्षेचा निकाल जाहीर होईल व जे २.१ (अ) प्रमाणे, तसेच इंग्रजी माध्यमासाठी ५.१(ब) प्रमाणे पात्र असतील व जे प्राधान्यक्रम अर्ज (Option Form) भरतील अशा उमेदवारांचा समावेश बी.एड. प्रवेश प्रक्रियेत केला जाईल.<br>ज्या उमेदवारांचा प्रवेश प्रक्रियेच्या मधल्या काळात पदवी परीक्षेचा निकाल लागेल व ते बी.एड. प्रवेशासाठी नियम क्रमांक २.१ (अ) तसेच इंग्रजी माध्यमासाठी ५.१ (ब) प्रमाणे पात्र असतील तर त्यांस त्यावेळी प्राधान्यक्रम अर्ज (Option Form) भरता येईल व त्यानंतरच्या प्रवेश प्रक्रियेत त्यांचा समावेश केला जाईल. मात्र अशा उमेदवारांना प्राधान्यक्रम अर्ज भरण्यापूर्वी झालेल्या प्रवेश प्रक्रियेत गुणवत्तेनुसार स्थान मागता येणार नाही. |
| ३ | **सामाईक परीक्षेचे स्वरूप :** | | |
| | ३.१ | | सामाईक प्रवेश परीक्षा ही मानसिक क्षमता, शिक्षक अभिक्षमता व सामान्यज्ञान या विषयांवर आधारित ५० गुणांची व १ तासाची वस्तुनिष्ठ (बहुपर्यायी प्रश्न) स्वरुपाची घेण्यात येईल. |
| | ३.२ | | सामाईक प्रवेश परीक्षेच्या प्रश्नपत्रिकेची भाषा मराठी व इंग्रजी असेल. |
| ४ | **प्रवेश परीक्षा शुल्क (प्रवेश अर्ज, सीईटी व प्रवेश प्रक्रिया शुल्क) :** | | |
| | ४.१ | | खुला संवर्गासाठी व महाराष्ट्राबाहेरील सर्व संवर्गासाठी रु.६५०/- |
| | ४.२ | | महाराष्ट्रातील मागासवर्गीयासाठी (अ.जा., अ.ज., वि.जा.भ.ज., इ.मा.व. व वि.मा.प्र.) रु.३५०/- |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | **सूचना** : एकापेक्षा अधिक प्रवेश प्रकारासाठी (७० टक्के, २८ टक्के, २ टक्के)/अध्यापन पध्दतीसाठी/माध्यमासाठी वेगळे शुल्क व अर्ज भरण्याची आवश्यकता नाही. |
| ५ | **केंद्रिय सामाईक परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठीचे निकष :** | | |
| | ५.१ | अ) | सामायिक प्रवेश परीक्षेस **(CET)** खुल्या संवर्गातील उमेदवारास ५० पैकी किमान १८ गुण व मागासवर्गीय संवर्गातील उमेदवारास किमान १५ गुण व महाराष्ट्राबाहेरील विद्यापीठातील सर्व संवर्गातील उमेदवारास किमान १८ गुण मिळाले असतील तर ते उमेदवार बी.एड. अभ्यासक्रमाच्या प्रवेशाला पात्र राहतील. |
| | | ब) | इंग्रजी माध्यमात प्रवेशोच्छूक उमेदवाराने सामायिक प्रवेश परिक्षेव्यतिरिक्त ५० गुणांची इंग्रजी भाषा ज्ञान चाचणी परीक्षा ( ELCT) देणे आवश्यक असून, या चाचणी परीक्षेत सर्व संवर्गातील उमेदवारांना ५० गुणांपैकी किमान १८ (३६ टक्के) गुण प्राप्त करणे आवश्यक आहे. |
| ७ | **अध्यापन पध्दतीच्या विषय निवडीबाबत:** | | |
| | ७.१ | **शालेय विषयातील पदवी/पदव्युत्तर पदवी :** | |
| | | अ) | उमेदवाराने जर शालेय विषयात पदवी/पदव्युत्तर पदवी प्राप्त केली असेल तर विशेष अध्यापन पध्दतीचा विषय प्रवेश अर्जात नोंद करताना निवडलेला विषय हा पदवी अभ्यासक्रमातील अनिवार्य/सक्तीचा (Compulsory) विषय असू नये. तो विषय ऐच्छिक (Optional)/विशेष (Special)/दुय्यम (Subsidiary) असावा अथवा पदव्युत्तर पदवीला तो विषय अभ्यासलेला असावा. विशेष अध्यापन पध्दतीसाठी (Special Method) निवडावयाचा विषय हा शालेय / उच्च माध्यमिक स्तरावरील विषयांपैकी एक असावा. या विषयाची सोय ज्या अध्यापक महाविद्यालयात आहे**,** त्या अध्यापक महाविद्यालयात तो प्रवेशास पात्र राहील. |
| | | ब) | जर एखादा उमेदवार एकापेक्षा अधिक विशेष अध्यापन पध्दतीसाठी पात्र व इच्छुक असेल तर अशा उमेदवाराने पात्र अध्यापन पध्दतीसाठी अर्जातील सुचनेप्रमाणे नोंद करणे आवश्यक आहे. उमेदवाराने अध्यापन पध्दतीसाठीचा विषय पदवीस्तरावर ऐच्छिक (Optional)/विशेष (Special)/दुय्यम (Subsidiary) म्हणून अभ्यासलेला असावा. अनिवार्य**/**सक्तीचा (Compulsory) विषय विशेष अध्यापन पध्दतीसाठी निवडता येणार नाही. |
| | | क) | उमेदवाराने अतिरिक्त विषय घेऊन अतिरिक्त पदवी प्राप्त केली असेल तर उपरोक्त ६.१(ब) या नियमाप्रमाणे तो विषय अध्यापन पध्दती निवडण्यास पात्र राहील, परंतु गुणवत्तेसाठी त्याचे प्रथम पदवीचे मुळ गुण ग्राह्य धरले जातील. |

| | | | |
|---|---|---|---|
| | | ड) | केंद्रीय प्रवेश प्रक्रियेत समाविष्ट असणाऱ्या महाविद्यालयाबाबतची प्रवेशक्षमता, माध्यम, अध्यापन पध्दती व शिक्षण शुल्क इत्यादी माहिती महाविद्यालयाचा प्राधान्यक्रम भरतेवेळी उमेदवारांना संकेतस्थळावर उपलब्ध होईल. |
| | ६.२ | **शालेय विषयाशिवाय इतर विषयातील पदवी :** | |
| | | अ) | शालेय विषयातील पदवीधर सोडून इतर शाखेच्या पदवीधरांनी प्रवेश अर्जात अध्यापन पध्दतीऐवजी आपल्या विद्याशाखेची नोंद करावी. संबंधित अध्यापन पध्दती सर्व महाविद्यालयात उपलब्ध नाहीत, परंतु ७.१ अ, ब, क आणि ड नुसार सर्व महाविद्यालयात संबंधित विषयांसाठी जागा राखीव आहेत. त्यामुळे गुणवत्तेनुसार प्रवेशित उमेदवाराला अशा महाविद्यालयात आपल्या विषयाची अध्यापन पध्दती मागण्याचा अधिकार असणार नाही. यास्तव जर उमेदवाराला आपल्या विद्याशाखेची निवड अध्यापन पध्दतीसाठी करावयाची असेल तर उमेदवाराने ज्या अध्यापक महाविद्यालयात आपला विषय आहे त्याच महाविद्यालयाचा प्राधान्यक्रम द्यावा. |
| | | ब) | केंद्रीय प्रवेश पध्दतीनुसार वरील विद्याशाखांच्या उमेदवारांना ज्या शिक्षणशास्त्र महाविद्यालयात प्रवेश मिळेल त्या महाविद्यालयाचे प्राचार्य संबंधित उमेदवारास महाविद्यालयात उपलब्ध अध्यापन पध्दतीपैकी पदवी स्तरावरील विषयांशी सुसंगत अध्यापन पध्दती **१** व **२** निश्चित करतील. उदा. आय.टी/कृषी/संगणक या विषयांची अध्यापन पध्दती उपलब्ध नसल्यास अशा विद्यार्थ्यांना विज्ञान/गणित हे विषय घ्यावे लागतील. |
| | | क) | प्रथम अध्यापन पध्दतीसाठी सोय असलेल्या प्रत्येक विषयासाठी माध्यमनिहाय, विषयनिहाय, संवर्गनिहाय, टक्केवारीनुसार एकूण उपलब्ध जागा विचारात घेऊन खालील प्रमाणे प्रवेश दिले जातील:<br>१) प्रथम पदवी प्राप्त केलेल्या विद्यापीठातील विद्यार्थ्यांसाठी ७० टक्के जागा.<br>२) प्रथम पदवी प्राप्त केलेले विद्यापीठ सोडून महाराष्ट्रातील इतर विद्यापीठातील विद्यार्थ्यांसाठी २८ टक्के जागा.<br>३) महाराष्ट्राबाहेरील विद्यापीठातून प्रथम पदवी प्राप्त केलेल्या विद्यार्थ्यांसाठी २ टक्के जागा.<br>४) हे विभाजन दुसऱ्या फेरीपर्यंत राहील.<br>प्रवेशाच्या दुसऱ्या फेरीनंतर जागा शिल्लक राहिल्यास संबंधित अध्यापक महाविद्यालयाला |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | प्राप्त झालेल्या राज्यस्तरीय गुणवत्ता यादीतून गुणवत्तेनुसार विषयनिहाय/संवर्गनिहाय प्रवेश दिले जातील. महाविद्यालयातील गुणवत्ता यादीतून ७० टक्के, २८ टक्के व २ टक्के याचा विचार न करता उमेदवारांकडून प्राप्त झालेल्या अर्जानुसार विषयनिहाय/संवर्गनिहाय एकत्रित गुणवत्ता यादी केली जाईल व त्या यादीनुसार प्रवेश दिले जातील. एखाद्या विषयाचे किंवा संवर्गाचे पुरेसे उमेदवार उपलब्ध न झाल्यास नियम क्रमांक २१.५, २१.६ व २१.७ या नियमांनुसार अदलाबदल करुन रिक्त जागा भरण्यात येतील व त्यासाठीचे वेळापत्रक आवश्यकतेनुसार स्वतंत्रपणे वेबसाईट व वर्तमानपत्रे यामधून प्रसिध्द केले जाईल. |
| | | | **टीप** : केंद्रीय प्रवेशपध्दतीव्दारे बी.एड. प्रवेश होत असल्यामुळे केंद्रीय बी.एड प्रवेशाचे नियम राज्यातील सर्व विद्यापीठांना लागू राहतील. |
| ७ | **शिक्षणशास्त्र महाविद्यालयातील जागांची विभागणी:** | | |
| | ७.१ | विद्याशाखानिहाय/ विषयनिहाय जागांची विभागणी : | |
| | | अ) | **मानव्य शास्त्र –**<br>१. इंग्रजी अध्यापन पध्दती :१५ टक्के<br>२. मराठी अध्यापन पध्दती :१५ टक्के<br>३. हिंदी अध्यापन पध्दती :१० टक्के<br>**४० टक्के**<br>**(ज्या महाविद्यालयात तीनपेक्षा अधिक भाषा असतील तेथील जागांचे विभाजन महाविद्यालयामध्ये उपलब्ध सर्व भाषा अध्यापन पध्दतीमध्ये समान राहील.)** |
| | | ब) | **शास्त्र शाखा –**<br>१.शास्त्र अध्यापन पध्दती : १५ टक्के<br>२.गणित अध्यापन पध्दती : १० टक्के<br>३.संगणक/माहिती तंत्रज्ञान/अभियांत्रिकी : ०५ टक्के .<br>**३० टक्के** |
| | | क) | वाणिज्य/व्यवस्थापन/विधी शाखा एकूण – : ३ टक्के<br>कृषि/वैद्यकीय शास्त्र : २ टक्के<br>**५ टक्के** |

| | | | |
|---|---|---|---|
| | | ड) | **सामाजिक शास्त्रे**<br>१) इतिहास अध्यापन पध्दती : १० टक्के<br>२) भूगोल अध्यापन पध्दती : १० टक्के<br>३) सामाजिक शास्त्रे : ०५ टक्के<br>**(७.१ मधील अ, ब, क तसेच ड मधील १ व २ या विद्याशाखा सोडून इतर सर्व विद्याशाखा)**<br>**टिप :ज्या महाविद्यालयात दोनपेक्षा अधिक सामाजिकशास्त्र अध्यापन पध्दती असतील त्या ठिकाणी उपलब्ध सर्व समाजशास्त्र अध्यापन पध्दतीमध्ये उपलब्ध जागांचे विभाजन समान राहील.**<br>**: २५ टक्के**<br>**एकूण टक्के (अ+ब+क+ड) : १०० टक्के** |
| | ७.२ | **विद्यापीठ क्षेत्रनिहाय जागांची विभागणी :** | |
| | | अ) | बी.एड. प्रवेशासाठी प्रत्येक शिक्षणशास्त्र महाविद्यालयातील एकूण प्रवेश क्षमतेच्या **७०** टक्के जागा संबंधित महाविद्यालय ज्या विद्यापीठ क्षेत्रात येते, त्या विद्यापीठाची प्रथम पदवी संपादन केलेल्या उमेदवारांसाठी राखीव असतील. |
| | | ब) | प्रत्येक शिक्षणशास्त्र महाविद्यालयाच्या एकूण प्रवेश क्षमतेच्या **२८** टक्के जागांसाठी संबंधित महाविद्यालय ज्या विद्यापीठ क्षेत्रात येते त्या विद्यापीठाचे पदवीधर उमेदवार वगळून महाराष्ट्रातील अन्य सर्व मान्यताप्राप्त विद्यापीठे, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक व इंदिरा गांधी राष्ट्रीय मुक्त विद्यापीठाची महाराष्ट्रातील केंद्रे, मौलाना आझाद राष्ट्रीय मुक्त विद्यापीठाची महाराष्ट्रातील केंद्रे येथून पदवी संपादन केलेल्या उमेदवारांसाठी राखीव असतील. |
| | | क) | सैन्य दलातील सक्रिय असलेले आजी (ॲक्टिव्ह सर्व्हिसेस/अधिकारी व कर्मचारी तसेच माजी सैनिकांची मुले/मुली/पती/पत्नी व स्वत: माजी सैनिक यांच्यासाठी राखीव जागेवर महाराष्ट्र राज्यात सेवेत असलेल्या तसेच महाराष्ट्रातील रहिवासी असलेल्या परंतु राज्याबाहेर सैन्य दलात नोकरीत असलेल्या अधिकारी/सैनिक/कर्मचारी यांची |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | मुले/मुली/पती/पत्नी यांनी इतर राज्यातील मान्यताप्राप्त विद्यापीठाची पदवी परीक्षा उत्तीर्ण केली आहे, असे उमेदवार उपरोक्त (ब) मधील **२८** टक्क्यामधील **२** टक्के राखीव असलेल्या जागांवर प्रवेशास पात्र राहतील. |
| | | ड) | शिक्षणशास्त्र महाविद्यालयांच्या एकूण प्रवेशक्षमतेच्या **२** टक्के जागा महाराष्ट्राबाहेरील मान्यताप्राप्त विद्यापीठातील पदवीधरांसाठी तसेच ७.**२** ब मधील मुक्त विद्यापीठांची महाराष्ट्रातील केंद्रे वगळून महाराष्ट्राबाहेरील केंद्रातील पदवीधरांसाठी राहतील. या जागेसाठी सर्व उमेदवार खुल्या गटातील समजण्यात येतील. त्यांना माध्यमाची व विषयाची प्रवेश नियमावलीतील अट पूर्ण करणे बंधनकारक राहील. |
| | | इ) | **३० (२८ + २)** टक्के जागांसाठी विद्यापीठांबाहेरील उमेदवारांचे पुरेसे अर्ज न आल्यास उर्वरित जागा संबंधित महाविद्यालयाच्या विद्यापीठ क्षेत्रातील **७०** टक्के कोट्याच्या प्रतिक्षा यादीतील उमेदवारांमधून गुणवत्तेनुसार भरण्यात येतील. |
| | | फ) | १) उर्दू व गुजराथी माध्यमाच्या अध्यापन पध्दती असलेल्या शिक्षणशास्त्र महाविद्यालयातील **७०** टक्के जागा त्याच विद्यापीठ क्षेत्रातील उमेदवारांमधून भरण्यात येतील व **३०** टक्के जागा राज्यातील अन्य विद्यापीठ क्षेत्रातील उमेदवारांमधून गुणवत्तेनुसार भरण्यात येतील. |
| | | | २) स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड या विद्यापीठ क्षेत्रातील उर्दू माध्यमाचे विद्यार्थी डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद या विद्यापीठाच्या उर्दू माध्यमाच्या महाविद्यालयात ७० टक्के जागांवर प्रवेशासाठी पात्र राहतील. उर्वरित २८ टक्के जागा राज्यातील अन्य विद्यापीठ क्षेत्रातील व २ टक्के जागा राज्याबाहेरील विद्यापीठाच्या उमेदवारांतून भरण्यात येतील. त्यानंतर काही जागा शिल्लक राहिल्यास त्याच विद्यापीठाच्या क्षेत्रातील प्रतिक्षा यादीतील उमेदवारांमधून भरण्यात येतील. |
| | | | ३) महाराष्ट्रातील उर्दू व गुजराथी माध्यमासाठी / अध्यापन पध्दतीसाठी पुरेसे उमेदवार प्रवेशासाठी उपलब्ध न झाल्यास रिक्त जागांवर अन्य राज्यातील उमेदवारांचा गुणवत्तेनुसार विचार करण्यात येईल. |
| | | ग) | काश्मिरी विस्थापितांसाठी शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण आणि सेवायोजन विभाग क्रमांक : टीईएम-८०९६/(७१८८)/टीई-१, दिनांक २४ जून, १९९६ अनुसार प्रत्येक शिक्षणशास्त्र महाविद्यालयातील प्रत्येक मंजूर तुकडीकरिता अधिकची १ जागा प्रवेशासाठी दिली जाईल. |

| | | | |
|---|---|---|---|
| | ७.३ | **इंग्रजी/उर्दू/हिन्दी/मराठी/गुजराथी माध्यमात प्रवेश घेऊ इच्छिणाऱ्या उमेदवारांसाठी विशेष सूचना:** | |
| | | | १) इंग्रजी/उर्दू/हिन्दी/मराठी/गुजराथी माध्यमात प्रवेश घेऊ इच्छिणाऱ्या उमेदवारांचे शालेय शिक्षण/उच्च माध्यमिक/पदवी/पदव्युत्तर स्तरावरील शिक्षण त्या त्या माध्यमातून होणे आवश्यक आहे, अथवा उमेदवाराने पदवीस्तरावर ती भाषा अभ्यासलेली असावी. उमेदवाराने ज्या माध्यमाच्या महाविद्यालयात प्रवेश घेतला आहे त्याला त्याच माध्यमात सरावपाठ घ्यावे लागतील. |
| | | | २) इंग्रजी माध्यमात प्रवेश घेऊ इच्छिणाऱ्या उमेदवारांची CET सोबत ५० गुणांची इंग्रजी भाषा ज्ञान चाचणी घेतली जाईल. या चाचणीत जे उमेदवार किमान ३६ टक्के गुण प्राप्त करतील, तेच इंग्रजी माध्यमाच्या महाविद्यालयांमध्ये प्रवेशास पात्र राहतील. इंग्रजी भाषाज्ञान चाचणी प्रश्नपत्रिकेचा अभ्यासक्रम व भारांश पुढे दिल्यानुसार असेल : |

| | | |
|---|---|---|
| 1 | Reading Comprehension **:** Picture, Poetry, Prose & Dialogue | **40%** |
| 2 | Vocabulary Focus - Spellings, Antonyms, Synonyms, Homonyms. | **10%** |
| 3 | Grammer Focus - a) Punctuation, b) Articles,<br>c) Prepositions, d) Conjunctions, e) Degree Of Adjectives. | **16%** |
| 4 | Sentence Formation **:**<br>a) Conversion of sentences from Affirmative-Negative, Interrogative-Assertive-Exclamatory,<br>b) Jumbled sentences,<br>c) Identifying errors in sentences. | 14% |
| 5 | Phonetics **:-** i) Phonetic transcription, ii) Accent, iii) Intonation Pattern | 06% |
| 6 | Verbal Idoms and Proverbs | 10% |
| 7 | Figures of Speech | 04% |
| | Total | 100% |

| | | | |
|---|---|---|---|
| ८ | **वेगवेगळ्या घटकांसाठी राखीव जागा (आरक्षण) :** | | |
| | ८.१ | | बी.एड अभ्यासक्रमासाठी ७० टक्के व ३० टक्के जागांवर प्रवेश देताना शासनाच्या आरक्षणासंबंधीच्या प्रचलित धोरणानुसार एकूण प्रवेश क्षमतेच्या ५० टक्के जागा महाराष्ट्रातील मागासवर्गीय घटकांसाठी राखीव असून त्यांचे संवर्गनिहाय आरक्षणाचे प्रमाण पुढीलप्रमाणे राहील:- |

| क्र. | संवर्ग | टक्केवारी |
|---|---|---|
| १ | अनुसूचित जाती व अनुसूचित जातीमधील बौध्द धर्म स्वीकारलेली व्यक्ती (S.C.) | १३ |
| २ | अनुसूचित जमाती (S.T.) | ७ |
| ३ | विमुक्त जाती (१४ तत्सम जाती)(VJ/DT)(अ) | ३ |
| ४ | भटक्या जमाती (जानेवारी १९९० पूर्वीच्या २८ व तत्सम जाती) (N.T.१)(ब) | २.५ |
| ५ | भटक्या जमाती (धनगर व तत्सम जमाती) (N.T.२) (क) | ३.५ |
| ६ | भटक्या जमाती (वंजारी व तत्सम जमाती) (N.T.३) (ड) | २ |
| ७ | इतर मागासवर्गीय (OBC) | १९ |
| ८ | एकूण | ५० |

| | | | |
|---|---|---|---|
| | ८.२ | अ) | प्रचलित शासन निर्णयानुसार ज्या जातींना नॉन-क्रिमीलेअर प्रमाणपत्र किंवा जात पडताळणी दाखला आवश्यक आहे, त्यांनी त्या प्रमाणपत्राच्या सत्यप्रती अंतिम प्रवेशाच्यावेळी मूळ प्रमाणपत्रासह सादर करणे अनिवार्य राहील. अन्यथा संबंधित उमेदवाराचा समावेश खुल्या संवर्गात करण्यात येईल व त्याचा खुल्या संवर्गानुसार पुढील फेरीत पात्रतेनुसार प्रवेशासाठी विचार करण्यात येईल. |
| | | ब) | नॉन-क्रिमीलेअर प्रमाणपत्र हे शासनाने वेळोवेळी प्रसिध्द कलेल्या निर्णयानुसार असणे अनिवार्य आहे. |
| | | क) | शासनाने वेळोवेळी प्रसिध्द केलेल्या शासन निर्णयानुसार समावेश करण्यात आलेल्या संवर्गानिहाय जाती, उपजाती तसेच संवर्गबदल त्या त्या निर्णयानुसार आरक्षणासाठी पात्र राहतील. |
| | | | **टिप:-**<br>१) घटनात्मक आरक्षण महाराष्ट्रातील निवासी उमेदवारास लागू राहील.<br>२) महाराष्ट्र राज्याच्या व्यतिरिक्त इतर राज्याचे असलेल्या किंवा इतर राज्याचे म्हणून महाराष्ट्र राज्यातून जातीचे प्रमाणपत्र घेतलेल्या उमेदवारांना ८.१ प्रमाणे घटनात्मक आरक्षण मिळणार नाही. तसेच ५.१ प्रमाणे लाभ मिळणार नाहीत. |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | **३)** आरक्षणाच्या संदर्भात महाराष्ट्र शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या निर्णयानुसार कार्यवाही करण्यात येईल. |
| | ८.३ | | **विशेष मागास प्रवर्गाबाबतची (SBC) तरतूद :** |
| | | | महाराष्ट्र शासनाच्या उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. टीईएम/ ३३९७/१२९२६/(९०८६)/तांशि-१, दि.११ जुलै, १९९७ च्या शासन निर्णयानुसार आरक्षित जागा एकूण ५० टक्के करण्यात आल्या. या शासन निर्णयाच्या तरतुदीनुसार :<br>१) विशेष मागास प्रवर्गात ज्या जाती आहेत, त्यापैकी काही जाती इतर मागासवर्गीयांमध्ये समाविष्ट होत्या. त्यामुळे सुरुवातीस विशेष मागास प्रवर्गांचे प्रमाणपत्रधारक उमेदवारांची जात ज्या मागास प्रवर्गामध्ये समाविष्ट होती त्या मागास प्रवर्गांच्या आरक्षणासाठी पात्र समजण्यात येईल.<br>**२)** गुणवत्ता यादीनुसार प्रवेश प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर जर कोणत्याही मागासवर्गीय प्रवर्गासाठी आरक्षित असलेल्या जागांपैकी काही जागा रिक्त राहिल्या तर त्या जागेवर एकूण प्रवेश क्षमतेच्या जास्तीत जास्त **२** टक्के पर्यंत विशेष मागासवर्गीय उमेदवारांना प्रवेशासाठी प्राधान्य देण्यात येईल.<br>**३)** यासंबंधी नॉन-क्रिमिलेअरबाबत वेळोवेळी प्रसिध्द झालेले न्यायालयाचे व शासनाचे निर्णय लागू राहतील. |
| | ८.४ | | खुल्या प्रवर्गाच्या **५०** टक्के जागा व राखीव प्रवर्गाच्या **५०** टक्के जागा यांच्या अंतर्गत खालील उमेदवारांना त्या समोर दर्शविल्याप्रमाणे स्वतंत्रपणे आरक्षण राहील.<br>अ) जिल्हा शल्य चिकित्सक यांनी किमान **४०** टक्के शारिरीकदृष्ट्या अपंग असल्याचे प्रमाणपत्र दिलेले उमेदवार - **३** टक्के.<br>ब) सैन्य दलातील सक्रिय सेवेत असलेले (ॲक्टिव्ह सर्व्हिस) कर्मचारी व माजी सैनिक यांची मुले/ मुली व पती/पत्नी व स्वत: माजी सैनिक - **२** टक्के |
| | | | **सूचना : हे अंतर्गत आरक्षण असल्यामुळे प्रथम गुणवत्तेनुसार या जागा भरल्या जातील व भरलेल्या जागा ज्या संवर्ग व विषयाच्या असतील त्या संवर्गाच्या व विषयाच्या तेवढ्या जागा नियमित प्रवेशाच्या जागांमधून कमी होतील.** |
| | ८.५ | | सर्व शिक्षणशास्त्र महाविद्यालयातील बी.एड. अभ्यासक्रमासाठी एकूण प्रवेश क्षमतेच्या **३०** टक्के जागांचे आरक्षण महिलांसाठी ठेवण्यात आले आहे. (संदर्भ : उच्च व तंत्र शिक्षण विभाग, |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | शासन निर्णय क्र.जाईली-१०००/७२३/२०००/मशि-१, दिनांक १७ एप्रिल, २०००.)<br>घटस्फोटित/परित्यक्ता/विधवा महिला यांना सक्षम अधिकाऱ्यांचे प्रमाणपत्र सादर केल्यास महिलांसाठी असलेल्या **३०** टक्के आरक्षणात समान गुणवत्तेच्या तुलनेत प्राधान्य देण्यात येईल. (संदर्भ: उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.एस.सी.टी./२००२/(१८/०२)/मशि-३, दिनांक २६ फेब्रुवारी, २००२). |
| | ८.६ | | अ) बी.एड. अभ्यासक्रमांसाठी प्रवेश घेऊ इच्छिणाऱ्या मागासवर्गीय विद्यार्थ्यांनी त्यांच्या जातीची प्रवेश अर्जात नोंद करावी. प्रवेश अर्जात नोंद करतांना जर ते शिष्यवृत्तीधारक असतील तर पूर्वीचा शिष्यवृत्ती क्रमांक नोंदवावा. मात्र अंतिम प्रवेशाच्या वेळी मागासवर्गीय उमेदवारांना मूळ प्रमाणपत्रे सादर करणे अनिवार्य राहील. जातीच्या वैधता प्रमाणपत्र/नॉन क्रिमीलेअर प्रमाणपत्राबाबत शासनाने वेळोवेळी काढलेले निर्णय लागू राहतील.<br>ब) शासनस्तरावरुन वेळोवेळी विविध संवर्गात काही जातींचा संवर्ग बदलला जातो. समावेश केला जातो, अशा बाबींची नोंद योग्य पुराव्यासह उमेदवारांनी सादर करावी. |
| ९ | **प्रवेशासंबंधी सर्वसाधारण नियम :** | | |
| | ९.१ | | मागासवर्गीय उमेदवारांनी प्रवेश अर्जात आपल्या जातीची नोंद करतांना जर शिष्यवृत्तीधारक असतील तर पूर्वीचा शिष्यवृत्ती क्रमांक नोंदवावा. तसेच वेळोवेळी प्रसिध्द केलेल्या शासन निर्णयानुसार ज्या जातींना जात पडताळणी प्रमाणपत्र आवश्यक आहे, तसेच बिगर उन्नत गटात मोडणाऱ्या उमेदवारांना प्रचलित नियमानुसार बिगर उन्नत गट प्रमाणपत्र **(Non Creamy Layer Certificate)** आवश्यक आहे, त्याच्या सत्यप्रती अंतिम प्रवेशाच्यावेळी मुळ प्रमाणपत्रासह सादर करणे अनिवार्य राहील. जर त्या उमेदवारांनी प्रवेशाच्यावेळी सदर मूळ प्रमाणपत्र सादर केले नाही तर अशा उमेदवारांना खुल्या संवर्गातील उमेदवार मानण्यात येईल. त्यानुसार पात्रता गुणवत्ता व शुल्काबाबत कार्यवाही करण्यांत येईल. |
| | ९.२ | | प्रवेश प्रक्रियेच्या वेळापत्रकानुसार तसेच वेळोवेळी देण्यात आलेल्या सुचनांनुसार उमेदवाराने कार्यवाही करणे ही उमेदवाराची जबाबदारी राहील. |
| | ९.३ | | **१) प्रवेश प्रक्रिया** : प्रवेश प्रक्रिया ही संगणकाच्या सहाय्याने व गुणवत्तेनुसार सरळ प्रवेश पध्दतीने होईल.<br>**२) संगणकाच्या सहाय्याने सरळ प्रवेश प्रक्रिया** : या पध्दतीत गुणवत्तेनुसार संगणकामार्फत संवर्गनिहाय, विषयनिहाय व माध्यमनिहाय प्रवेश करण्यात येतील. या प्रवेशासाठी |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | समुपदेशनास बोलावले जाणार नाही. प्रवेशासंबंधीची संपूर्ण माहिती संकेतस्थळावर उपलब्ध असेल. आवश्यकतेनुसार उमेदवारांशी त्यांच्या पत्त्यावर अथवा त्यांनी दिलेल्या दूरध्वनी क्रमांक/ भ्रमणध्वनीवर संपर्क साधण्यात येईल. तेव्हा प्रवेश अर्जावर संपर्क पत्ता/ दूरध्वनी क्रमांक/ भ्रमणध्वनी क्रमांक योग्य प्रकारे नोंदविणे आवश्यक आहे. |
| १० | **प्रवेश प्रक्रियेचे टप्पे :** | | |
| | १०.१ | **ऑनलाईन रजिस्ट्रेशन प्रक्रिया :** | |
| | | I | बी.एड. प्रवेश प्रक्रिया **२०१५-१६** साठी प्रवेश अधिसूचनेतील या संकेतस्थळावर जावे. |
| | | II | प्रवेश प्रकियेची नोंदणी सुरु करण्यासाठी (**Register Online**) रजिस्टर ऑनलाईन या बटणावर क्लिक करावे. |
| | | III | कृपया फॉर्म इंग्रजी भाषेत भरावा. |
| | | IV | कृपया स्क्रीनवर दिसणाऱ्या प्रश्नांची उत्तरे दिलेल्या पर्यायांमधून योग्य पर्याय निवडून द्या. सॉफ्टवेअर आपण दिलेल्या उत्तराप्रमाणे प्राथमिक पात्रता तपासणार आहे. |
| | | V | जर तुम्ही पात्र असाल तर घोषणा ब्लॉकमधील चेक बॉक्समध्ये टिक करा. |
| | | VI | चेक बॉक्सवर क्लिक केल्यानंतर (**I am Eligible, Register me**) मी पात्र आहे मला रजिस्टर करा असे बटण दिसेल. |
| | | VII | नोंदणी पुढे चालू ठेवण्यासाठी त्या बटणावर क्लिक करणे. |
| | | VIII | आवश्यक असणारी व विचारण्यांत आलेली माहिती ऑनलाईन नोंदणी फॉर्म मध्ये भरावी. |
| **११** | **प्रवेश शुल्क भरण्याची माध्यमे व कार्यपध्दती :** | | |
| | ११.१ | **प्रवेश शुल्क ऑन लाईन पध्दतीने किंवा एस. बी. आय. बँकेच्या चलनाद्वारे स्वीकारण्यात येईल.** | |
| | | i | आवश्यक ती माहिती भरल्यानंतर सिस्टिम लॉगिन आयडी दर्शविल, पासवर्ड आणि एस.बी.आय. चलन/ए.एल.सी. चलन स्क्रीनवर दिसेल. आपल्याला लॉगिन आयडी आणि पासवर्ड एसएमएसद्वारेही मिळेल. (कृपया त्यासाठी आपला अचुक मोबाईल नंबर द्या) हा लॉगिन आयडीच तुमचा फॉर्म नंबर असेल. (एसएमएस सुविधा ही उमेदवारांना देण्यांत येणारी अतिरिक्त सुविधा असेल. जर कोणत्याही उमेदवारास एसएमएस मिळाला नाही तर त्यासाठी प्रवेश प्रक्रिया करणारी एजन्सी जबाबदार राहणार नाही.) |

| | | | |
|---|---|---|---|
| | | ii | **Print My Log in Details & Challan details** माझे लॉगिन विवरण आणि विवरण चलन प्रिंट या बटणावर क्लिक करुन लॉगिन विवरण आणि चलन यांची प्रिंट घ्यावी. |
| | | iii | उमेदवाराने नोंदणीच्या **२** तासानंतर किंवा दुसऱ्या कामकाजाच्या दिवशी एस.बी.आय. बँकेत जावे. बँकेत जातांना सोबत बँकेचे पूर्णपणे भरलेले चलन घेऊन जावे. अर्जाची फी तसेच बँक चार्जेस रोख भरल्यानंतर बँक आपणास फी स्विकारल्याबद्दलची उमेदवाराचे चलन प्रतीवर पोहोच देईल. |
| | | iv | उमेदवार नेटवर्कींग/क्रेडीट कार्ड/डेबिट कार्ड या माध्यमांमार्फतही ऑनलाईन शुल्क भरु शकतात. |
| | | v | जाहिरातीत उल्लेख केलेल्या अंतिम तारखेच्या अगोदर विहीत शुल्क भरावे. एकदा भरलेली फी परत केली जाणार नाही. |
| | | vi | भारतीय स्टेट बँकेत किंवा नेट बँकिंगच्या स्वरुपात शुल्क भरल्यास साधारणत: कार्यालयीन कामकाजाच्या एक दिवसानंतर आपण त्याबाबतची पडताळणी करु शकता. |
| | | vii | जर आपण क्रेडिट कार्ड/डेबिट कार्ड या माध्यमातून शुल्क भरले असेल तर ते पडताळण्यासाठी साधारणत: कार्यालयीन कामकाजाचे दोन दिवसांचा कालावधी लागतो. |
| | | | वेबसाईटवर प्रवेश शुल्क भरण्याची माहिती आपल्या लॉगिन आयडी आणि पासवर्डचा उपयोग करुन पाहू शकता. प्रवेश शुल्क प्राप्त झाल्यानंतर आपणास एसएमएसवर देखील माहिती मिळू शकेल. |
| | ११.२ | **प्रवेश शुल्क भरल्यानंतरची ऑनलाईन अर्ज प्रक्रिया :** | |
| | | i | प्रवेश शुल्क भरल्याचा एसएमएस प्राप्त झाल्यानंतर वेबसाईटवर लॉगिन करुन **Fill Application Form** आवेदन पत्र भरण्यासाठी फॉर्म या लिंकवर क्लिक करा. |
| | | ii | अर्जामध्ये खालील माहिती भरणे आवश्यक आहे:-<br>(१) व्यक्तिगत माहिती, (२) संपर्काबद्दल माहिती, (३) आरक्षणाबाबत माहिती,<br>(४) फोटो आणि सहीची स्कॅन कॉपी अपलोड करणे, (५) शैक्षणिक अर्हता, (६) अनुभवाची माहिती, (७) इतर आवश्यक माहिती. |
| | | iii | वरील दिलेली सर्व माहिती पुरविल्याशिवाय अर्जाची पूर्तता होणार नाही. |
| | | iv | पूर्ण आवेदन पत्र भरल्यानंतर आवेदन भरल्याबद्दलची मान्यता द्या. |
| | | v | आपल्या माहितीसाठी फॉर्मची प्रिंटआऊट घ्यावी. |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | **टिप :**<br>१) मा.शिक्षण संचालक, उच्च शिक्षण किंवा प्रवेश प्रक्रिया पार पाडणाऱ्या एजन्सीकडे आवेदन पत्राची प्रिंटआऊट पाठविण्याची आवश्यकता नाही.<br>२) प्रवेश अर्ज भरण्याची प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर वेळोवेळी देण्यात येणाऱ्या माहितीसाठी वेबसाईट नियमित पहावी.<br>३) लेखी परीक्षेसाठी प्रवेशपत्र, सीईटी मार्कशीट (**CET Mark-sheet**), प्राधान्यक्रम अर्ज भरणे, तसेच प्रवेशानंतर तात्पुरते प्रवेशपत्र काढण्यासाठी वर्तमानपत्रात व वेबसाईटवर दिलेल्या वेळापत्रकाप्रमाणे कार्यवाही करावी. यासंबंधी कोणताही पत्रव्यवहार केला जाणार नाही.<br>४) अपूर्ण भरलेल्या प्रवेश अर्जासाठी उच्च शिक्षण संचालनालय जबाबदार राहणार नाही. |
| | ११.३ | | सामाईक प्रवेश परीक्षेत पात्र ठरलेल्या उमेदवारांनी वेळापत्रकात नमूद केल्याप्रमाणे ऑनलाईन महाविद्यालयाचा प्राधान्यक्रम अर्ज तसेच शैक्षणिक अर्हता गुण व सीईटी गुण भरावेत. |
| १२ | **गुणवत्ता यादीतील क्रम ठरविण्याची पध्दती :** | | |
| | | | सामाईक प्रवेश-परीक्षेनंतर पात्र उमेदवारांच्या गुणवत्ता यादीसाठी गुणवत्ता क्रम ठरविण्यासाठी उमेदवाराने मिळविलेल्या गुणांचा विचार पुढीलप्रमाणे करण्यात येईल : |
| | अ) | १) | या पुस्तिकेतील नियम क्र. **२.१**(अ) नुसार प्राप्त गुण. |
| | | २) | जो उमेदवार पदव्युत्तर गुणांमुळे पात्र ठरला आहे, त्याची गुणवत्ता पदवीला प्राप्त गुण. |
| | ब) | | सामाईक प्रवेश परीक्षेत उमेदवाराने प्राप्त केलेले गुण. |
| | क) | | उमेदवाराने १२(अ)(१) अथवा १२(अ)(२) आणि १२(ब) गटात प्राप्त केलेल्या गुणांची बेरीज करुन येणाऱ्या गुणांकानुसार उमेदवाराचा गुणवत्ता क्रम ठरविला जाईल. |
| १३ | **गुणवत्ता यादी :** | | |
| | १३.१ | | सर्व प्रवेश पात्र अर्जांची गुणवत्ता यादी ७० टक्के, २८ टक्केसाठी माध्यमनिहाय/ विषयनिहाय/संवर्गनिहाय तसेच अंतर्गत आरक्षणासाठी (आजी/माजी सैनिक व अपंग) तसेच २ टक्के साठी आणि काश्मिर विस्थापितांसाठी स्वतंत्र गुणवत्ता याद्या तयार करण्यात येतील. |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | गुणवत्ता यादीतील माहिती आपणांस जाहिरातीतील वेबसाईटवर उपलब्ध होऊ शकेल. |
| | १३.२ | | गुणवत्ता यादीत जर समान गुण असतील तर प्राधान्यक्रम ठरविण्यासाठी खालील पध्दतीचा अवलंब केला जाईल :<br>१) प्रथम सी.ई.टी. गुणांचे आधिक्य, हेही जर समान असतील तर,<br>२) पदवी स्तरावरील निव्वळ गुणांचे आधिक्य, हेही जर समान असतील तर,<br>३) क्रमशः तृतीय, द्वितीय व प्रथम वर्षाच्या गुणांचे आधिक्य, हेही समान असतील तर,<br>४) वयामधील जेष्ठता. |
| १४ | **महाविद्यालयांचे प्राधन्यक्रम देणे :** | | |
| | | | अ) उमेदवाराला एकदाच प्राधन्यक्रम अर्ज भरता येईल.<br>ब) उमेदवाराला एका वेळी जास्तीत जास्त १०० अध्यापक महाविद्यालयांचा प्राधान्यक्रम देता येईल.<br>क) उमेदवाराला जर प्राधान्यक्रमात बदल करावयाचा असेल तर तो बदल दोन फेऱ्यांच्या वेळापत्रकात दिलेल्या मधल्या कालावधीमध्ये करता येईल; परंतु प्राधान्यक्रम दिलेल्या महाविद्यालयांची संख्या १०० पेक्षा जास्त असणार नाही. |
| १५ | **महाविद्यालयाचा प्राधान्यक्रम भरण्याची पध्दती :** | | |
| | १५.१ | | हा अर्ज भरत असताना ज्या महाविद्यालयात उमेदवाराला प्रवेश घ्यावयाचा आहे, अशा महाविद्यालयांचे प्राधान्यक्रम भरावेत. |
| | १५.२ | | महाविद्यालयाचा देण्यात आलेला प्राधान्यक्रम व गुणवत्ता यावर प्रवेश आधारित असल्यामुळे महाविद्यालयाचा प्राधान्यक्रम अतिशय काळजीपूर्वक भरावा. |
| | १५.३ | | महाविद्यालयाचा प्राधान्यक्रम प्रवेशासाठी महत्त्वाचा असल्याने उमेदवाराने पात्र विषय व माध्यमासाठी उपलब्ध असणाऱ्या जास्तीत जास्त १०० अध्यापक महाविद्यालयांसाठी योग्य प्राधान्यक्रम देणे आवश्यक आहे. |
| | १५.४ | | एक किंवा एकापेक्षा अधिक विषयांसाठी, एकापेक्षा अधिक माध्यमांसाठी, एका महाविद्यालयासाठीचा प्राधान्यक्रम एकच असावा. |
| | १५.५ | | उमेदवाराला प्रत्येक फेरीनंतर पुढील फेरी सुरु होण्यापूर्वी प्राधान्यक्रमात वेळापत्रकात दर्शविल्याप्रमाणे बदल करता येईल. तसेच ज्या उमेदवाराने प्राधान्यक्रम भरले नाहीत त्यांनाही प्राधान्यक्रम अर्ज भरता येईल. |

| | | | |
|---|---|---|---|
| १६ | **प्रवेश अर्जात अध्यापन पध्दती नोंदविण्यासंबंधी सूचना :** | | |
| | १६.१ | | शास्त्र अध्यापनाच्या प्रवेशासाठी भौतिक / रसायन / जीवशास्त्र यांच्या स्वतंत्र तसेच एकत्रित गुणवत्ता याद्या तयार केल्या जातील. ज्या विद्यापीठामध्ये भौतिक / रसायन / जीवशास्त्र या विषयांच्या स्वतंत्र पध्दती आहेत तेथे त्या स्वतंत्र याद्या वापरल्या जातील व ज्या विद्यापीठात शास्त्र विषयाच्या (Science) सर्व शाखा शास्त्र अध्यापन पध्दतीत येतात तेथे एकत्रित गुणवत्तायादीतून प्रवेश दिला जाईल. तेव्हा शास्त्र विषयाच्या उमेदवारांनी आपल्या विशेष विषयांबरोबर शास्त्र अध्यापन पध्दतीवरही खूण करावी. |
| | १६.२ | | गणित अध्यापन पध्दतीसाठी फक्त बी.एस्सी. गणित/सांख्यिकी विषय असलेले उमेदवार पात्र राहतील. बी.ए. गणित पदवीधारक उमेदवारांनी मात्र सामाजिकशास्त्र अध्यापन पध्दतीसाठी खूण करावी. |
| | १६.३ | | अ) विज्ञान व गणित विद्या शाखा सोडून इतर सर्व शास्त्र शाखेच्या आपल्या पदवीच्या विषयानुसार असलेल्या विद्याशाखेसमोर खूण करावी.<br>ब) ज्या विद्यापीठात होम सायन्स अध्यापन पध्दती आहे तेथे विज्ञान / कला / कृषी या विद्याशाखेतील होम सायन्सचे उमेदवार पात्र राहतील. त्यामुळे संबंधित उमेदवाराने १ च्या सूचनेप्रमाणे संबंधित विद्याशाखेसमोरच्या खुणेबरोबरच गृह विज्ञान (Home Science) या अध्यापन पध्दतीसमोरही खूण करावी. (उदा.नागपूर विद्यापीठातील महाविद्यालये) |
| | १६.४ | | अ) इतिहास / भूगोल या विषयांसाठी स्वतंत्र खूण करावी. या विषयांच्या उमेदवाराने नंतर सामाजिक शास्त्रे यावर खूण करु नये.<br>ब) अर्थशास्त्र / राज्यशास्त्र / संगीत /गृह विज्ञान / पाली / गुजराथी / सिंधी/ गृह अर्थशास्त्र / संस्कृत हे विषय काही महाविद्यालयात आहेत. ज्यांना त्याच महाविद्यालयात प्रवेश हवा असेल त्यांनी त्या महाविद्यालयांचा प्राधान्यक्रम द्यावा. ज्या महाविद्यालयात हे विषय नाहीत त्या महाविद्यालयाचा प्राधान्यक्रम द्यावयाचा असेल तर सामाजिक शास्त्रे या विषयावर खूण करावी.<br>क) नियम क्रमांक ६.१ मधील अ, ब, क आणि ड या विद्याशाखा सोडून इतर सर्व विद्याशाखेच्या उमेदवारांनी सामाजिक शास्त्रे या पध्दतीसमोर खूण करावी. |
| | १६.५ | | उमेदवारांचा पदवीचा, बी.एड. प्रवेशासाठीचा पात्र-विषय प्रवेश अर्जातील अध्यापन-पध्दतीत दर्शविला असेल तर संबंधित उमेदवाराने त्यासमोर खूण करावी. |

| | | | |
|---|---|---|---|
| | १६.६ | | प्रवेश अर्जातील माध्यम व पध्दती भरण्याची संपूर्ण जबाबदारी उमेदवारांची आहे. अर्जात भरलेल्या चुकीच्या किंवा अपूर्ण माहितीस उमेदवार स्वत: जबाबदार राहील. अपूर्ण माहितीमुळे उमेदवाराचा अर्ज स्विकारला गेला नाही तर त्यासाठी उमेदवार स्वत: जबाबदार राहील. |
| १७ | **प्रवेश फेऱ्या:** | | |
| | १७.१ | | प्रवेशासाठी खालील प्रमाणे ऑन लाईन फेऱ्या घेण्यात येतील :<br>**प्रथम फेरी** : शासकीय/अनुदानित/केंद्रीय प्रवेश प्रक्रियेत सहभागी विनाअनुदानित व कायम विनाअनुदानित महाविद्यालये.<br>**दुसरी फेरी** : शासकीय/अनुदानित/केंद्रिय प्रवेश प्रक्रियेत सहभागी विनाअनुदानित व कायम विनाअनुदानित महाविद्यालये. |
| | १७.२ | | प्रवेशाच्या दोन फेऱ्यानंतर जागा शिल्लक राहिल्यास संबंधित अध्यापक महाविद्यालयामार्फत राज्यस्तरीय गुणवत्ता यादीतून गुणवत्तेनुसार विषयनिहाय/संवर्गनिहाय प्रवेश दिले जातील व त्यासाठीचे आवश्यक ते वेळापत्रक स्वतंत्रपणे वेबसाईट व वर्तमानपत्रे यामधून प्रसिध्द केले जाईल. |
| | १७.३ | | आवश्यकतेनुसार फेरी कमी जास्त करण्याचे किंवा प्रवेश प्रक्रियेच्या स्वरुपात बदल करण्याचे अधिकार मा.शिक्षण संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे, अध्यक्ष, बी.एड. प्रवेश समिती/सक्षम अधिकारी यांच्याकडे राखून ठेवण्यात येत आहेत. |
| | | | टीप :<br>१) केंद्रीय प्रवेश प्रक्रियेमध्ये सहभागी झालेल्या शिक्षणशास्त्र महाविद्यालयांची यादी संकेतस्थळावर प्राधान्यक्रम अर्ज भरतांना उपलब्ध करुन देण्यात येईल. त्यात काही बदल झाल्यास तो वेळोवेळी संकेतस्थळावर दर्शविण्यात येईल.<br>२) माहिती पुस्तिकेत देण्यात आलेले वेळापत्रक संभाव्य आहे.<br>३) त्यात बदल झाल्यास तो वेळोवेळी अधिसूचनेतील या वेबसाईटवर व वृत्तपत्रातूनही प्रसिध्द केला जाईल.<br>४) प्रवेश प्रक्रियेच्या फेऱ्या व वेळापत्रकात बदल करण्याचे अधिकार शिक्षण संचालक, उच्च शिक्षण व अध्यक्ष बी.एड. प्रवेश समिती / सक्षम अधिकारी यांनी स्वत:कडे राखून ठेवले आहेत. |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | **५)** अपूर्ण भरण्यात आलेला अर्ज स्वीकारण्यात येणार नाही व त्यासाठी उमेदवार जबाबदार राहील.<br>**६) CET** परीक्षेच्या प्रश्नपत्रिकेची भाषा मराठी व इंग्रजी राहील.<br>**७)** संपूर्ण प्रवेश प्रक्रिया ऑनलाईन राहील. |
| १८ | **अभ्यासक्रमाची शुल्क आकारणी :** | | |
| | १८.१ | **शिक्षण शुल्क :** | |
| | | | (शासन निर्णय क्र. **२००१**/बी.एड./(**४४२/०७**)/मशि-**३,** दि.**२४** मे**, २००२** व शासन निर्णय क्रमांक एसटीसी **२००३/**बी.एड.प्रवेश (**११०/०३**)/मशि-**३,** दि.**७** मे **२००३** नुसार) **२०१५-१६** या शैक्षणिक वर्षाकरिता अंतरिम शिक्षण शुल्क खालील प्रमाणे राहील:-<br>अ) शासकीय व अनुदानित महाविद्यालयांसाठी रु.**१८,८५६/-**<br>प्रथम वर्ष रु. **९,४२८/-**<br>द्वितीय वर्ष रु. **९४२८/-**<br>सदर शुल्कामध्ये शासनाकडून बदल झाल्यास विद्यार्थ्यांना सुधारीत शुल्कानुसार फरकाची रक्कम भरावी लागेल.<br>ब) विनाअनुदानित व कायम विनाअनुदानित अशासकीय महाविद्यालयांसाठी : शिक्षण शुल्क समितीकडून विहित केलेले शुल्क.<br>क) या शुल्काव्यतिरिक्त विद्यापीठाने इतर शुल्क निर्धारित केल्यास ते शुल्क विद्यापीठीय क्षेत्रात अध्यापक महाविद्यालयात प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांना भरणे बंधनकारक राहील. |
| | १८.२ | **इतर शुल्क :** | |
| | | | शासकीय व अनुदानित महाविद्यालयांसाठी शिक्षण शुल्काव्यतिरिक्त प्रथम वर्ष व द्वितीय वर्षासाठी प्रवेश शुल्क, ग्रंथालय शुल्क, जिमखाना शुल्क व प्रयोगशाळा शुल्क पुढीलप्रमाणे आकारण्यात येईल:- प्रथम वर्ष :- |

| खुला प्रवर्ग | | मागासवर्गीय संवर्ग | |
|---|---|---|---|
| अ)प्रवेश शुल्क | रु.१००/- | अ) प्रवेश शुल्क | रु.----/- |
| ब)ग्रंथालय शुल्क | रु.१,०००/- | ब)ग्रंथालय शुल्क | रु.१,०००/- |
| क)जिमखाना शुल्क | रु.१,०००/- | क)जिमखाना शुल्क | रु.१,०००/- |
| ड)प्रयोगशाळा शुल्क | रु.१,०००/- | ड)प्रयोगशाळा शुल्क | रु.१,०००/- |
| | एकूण रु.३,१००/- | | एकूण रु.३,०००/- |

<table>
<tr><td></td><td></td><td></td><td>द्वितीय वर्ष :-
<table>
<tr><th colspan="2">खुला प्रवर्ग</th><th colspan="2">मागासवर्गीय संवर्ग</th></tr>
<tr><td>अ)प्रवेश शुल्क</td><td>रु.---/-</td><td>अ) प्रवेश शुल्क</td><td>रु.---/-</td></tr>
<tr><td>ब)ग्रंथालय शुल्क</td><td>रु.५००/-</td><td>ब)ग्रंथालय शुल्क</td><td>रु.५००/-</td></tr>
<tr><td>क)जिमखाना शुल्क</td><td>रु.५००/-</td><td>क)जिमखाना शुल्क</td><td>रु.५००/-</td></tr>
<tr><td>ड)प्रयोगशाळा शुल्क</td><td>रु.५००/-</td><td>ड)प्रयोगशाळा शुल्क</td><td>रु.५००/-</td></tr>
<tr><td colspan="2">एकूण रु.१,५००/-</td><td colspan="2">एकूण रु.१,५००/-</td></tr>
</table>
</td></tr>
<tr><td></td><td>१८.३</td><td>१)</td><td>अ) संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे परिपत्रक क्र.सकक्षं/शिक्षण/भासशि/डी.एड./बी.एड./का-४/२००४-०५/८८४, दिनांक ११.०६.२००४ नुसार शासकीय अध्यापक महाविद्यालयातील विद्यार्थ्यांना ज्या प्रचलित दराने शिष्यवृत्ती/शिक्षण फी देण्यांत येते, त्याच प्रचलित दराने कायम विनाअनुदानित अध्यापक महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती/शिक्षण फी यांची प्रतिपूर्ती करण्यात येईल. महाराष्ट्र शासनाच्या वेळोवेळी प्रसिध्द केलेल्या/होणाऱ्या निर्णयानुसार कायम विनाअनुदानित अध्यापक महाविद्यालयातील मागासवर्गीय विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती/शिक्षण फीची प्रतिपूर्तता करण्याची कार्यवाही संबंधित महाविद्यालयामार्फत करण्यात येईल.<br>ब) ज्या विद्यार्थ्यांनी पदव्युत्तर प्रवेश घेऊन एक वर्षाचा (एम.ए., एम.एस्सी., एम.कॉम. इ. प्रथम वर्ष) अभ्यासक्रम पूर्ण केला आहे; परंतु पदव्युत्तर अभ्यासक्रम पूर्ण केला नाही असे उमेदवार शिष्यवृत्तीस/शिक्षण फी प्रतिपूर्तीस पात्र राहणार नाहीत.<br>क) शिष्यवृत्तीधारकाने मागील शिष्यवृत्ती प्राप्त क्रमांक देणे आवश्यक आहे.<br>ड) मागासवर्गीय विद्यार्थ्याने एका महाविद्यालयात प्रवेश घेतल्यानंतर जर तो रद्द करावयाचा असल्यास नियम क्र.२४ प्रमाणे मागासवर्गीय उमेदवाराला शुल्क परतावा करावा लागेल.</td></tr>
<tr><td></td><td></td><td>२)</td><td>ज्या महाविद्यालयांचे शिक्षण शुल्क मा.शिक्षण शुल्क समितीने निर्धारित केलेले नाही अशा महाविद्यालयांत प्रवेश घेतेवेळी संबंधित विद्यार्थ्यांना मा.शिक्षण शुल्क समितीने ठरवून दिलेली अंतरिम फी (Interim Fee) भरावी लागेल. सदर महाविद्यालयांचे अंतिम शुल्क निश्चित झाल्यावर विद्यार्थ्यांना या महाविद्यालयांची उर्वरित फी भरावी लागेल अथवा ती कमी असल्यास संस्थेस ती विद्यार्थ्यांना परत करावी लागेल व तशा प्रकारचे करार विद्यार्थी व प्राचार्य यांच्यामध्ये प्रवेश घेतेवेळी होणे आवश्यक आहे.</td></tr>
</table>

| | | | |
|---|---|---|---|
| | | ३) | महाराष्ट्र शासन/शिक्षण शुल्क समितीने सन **२०१५-२०१६** साठी शासकीय/अनुदानित/कायम विनाअनुदानित महाविद्यालयाच्या शुल्कामध्ये सुधारणा केल्यास ते शुल्क विद्यार्थ्यांवर बंधनकारक राहील. |
| | | ४) | या शुल्काव्यतिरिक्त विद्यापीठाने इतर शुल्क निर्धारित केल्यास ते शुल्क त्या त्या विद्यापीठीय क्षेत्रातील अध्यापक महाविद्यालयात प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांना भरणे आवश्यक आहे. |
| १९ | **तात्पुरता प्रवेश :** | | |
| | १९.१ | | उमेदवाराने अर्जात नमुद केलेल्या गुणवत्तेनुसार व त्याने दिलेल्या महाविद्यालयाच्या प्राधान्यक्रमानुसार माध्यमवार, विषयवार, संवर्गनिहाय उपलब्ध जागेवर केंद्रीय प्रवेश प्रक्रियेद्वारा तात्पुरता प्रवेश दिला जाईल. वेळापत्रकानुसार तात्पुरत्या प्रवेशित उमेदवारांची यादी वेबसाईटवर प्रसिध्द केली जाईल. ज्या उमेदवारांना तात्पुरता प्रवेश मिळाला आहे अशा उमेदवारांनी ऑनलाईन तात्पुरते प्रवेशपत्र प्राप्त करुन घ्यावे. |
| | १९.२ | | तात्पुरत्या प्रवेशित उमेदवाराने संबंधित महाविद्यालयात वेळापत्रकानुसार तात्पुरते प्रवेशपत्र व सर्व मूळ प्रमाणपत्रांसह उपस्थित रहावे. तात्पुरत्या प्रवेशित उमेदवाराचा प्रवेश, उमेदवाराने अर्जात नमुद केलेल्या माहितीच्या आधारे देण्यांत येतो. या अर्जाची पडताळणी केंद्रीय प्रवेश समितीमार्फत करण्यांत येत नाही. महाविद्यालयामार्फत उमेदवाराने सादर केलेल्या मूळ प्रमाणपत्रांच्या आधारे त्याची प्रवेश पात्रता/गुणवत्ता/ संवर्ग/विषय/माध्यम/विद्यापीठ पात्रता याची तपासणी केली जाईल. मात्र त्यात काही त्रुटी आढळल्यास महाविद्यालयामार्फत प्रवेश रद्द केला जाईल. सर्व प्रमाणपत्रांची छाननी करुन प्रवेश अंतिम करण्याची जबाबदारी सर्वस्वी महाविद्यालयाच्या प्राचार्यांची राहील. तपासणीअंती पात्र उमेदवाराचा प्रवेश उमेदवाराने संबंधित महाविद्यालयाचे शुल्क भरल्यानंतर अंतिम केला जाईल. उमेदवाराच्या प्रवेशानंतर काही अपात्रता निदर्शनास आल्यास त्यास संबंधित अध्यापक महाविद्यालयाचे प्राचार्य जबाबदार राहतील. |
| | १९.३ | | केंद्रीय बी.एड. प्रवेशाचे वेळापत्रक अधिसूचनेबरोबर प्रसिध्द करण्यात येईल, तसेच वेबसाईटवर देण्यात येईल. वेळापत्रकात काही बदल असल्यास तो वेळोवेळी संकेतस्थळावर व वर्तमानपत्रात जाहीर केला जाईल. |
| | १९.४ | | विहित मुदतीत प्रवेशित उमेदवार संबंधित महाविद्यालयात उपस्थित न झाल्यास दिलेला तात्पुरता प्रवेश आपोआप रद्द होईल व सदर प्रवेशावर विद्यार्थ्यांचा कोणताही अधिकार असणार नाही. |

| | | | |
|---|---|---|---|
| २० | **महाविद्यालयात प्रवेश घेताना संबधित विद्यार्थी व महाविद्यालय यांनी घ्यावयाची दक्षता :** | | |
| | २०.१ | | उमेदवाराने भरलेला प्रवेश अर्ज केंद्रीय प्रवेश प्रक्रियेव्दारा तपासला जात नाही. प्रवेश मिळाल्यानंतर महाविद्यालयामार्फत सर्व प्रमाणपत्रांची छाननी होते व त्यामध्ये काही त्रुटी आढळल्यास प्राचार्यांमार्फत प्रवेश रद्द केला जाईल. त्यामुळे उमेदवारांने प्रवेश अर्जात योग्य व सत्य माहिती भरणे ही सर्वस्वी उमेदवाराची जबाबदारी असून चुकीची माहिती भरल्यामुळे प्रवेश रद्द झाल्यास त्यासाठी संबंधित उमेदवारच जबाबदार राहील. |
| | २०.२ | | प्रवेशअर्ज भरताना उमेदवाराने नमूद केलेली गुणवत्तेसंबंधीची व प्रमाणपत्रांसबंधीची माहिती अंतिम राहील. यात प्रवेश अर्ज भरल्यानंतर कोणताही बदल करता येणार नाही. |
| | २०.३ | | उमेदवाराने ७० टक्के / २८ टक्के / २ टक्के कोटा यापैकी प्रवेशासाठी पात्र असणाऱ्या कोट्यासमोर खूण करावी. |
| | २०.४ | | उमेदवाराने प्रत्येक पात्र अध्यापन पध्दतीची स्वतंत्र नोंद करावी. तसेच पात्र माध्यमांचा प्राधान्यक्रम द्यावा. |
| | २०.५ | | प्राधन्यक्रम अर्ज भरताना उमेदवाराने धारण केलेली अर्हता ही अंतिम राहील व त्यावरुन गुणवत्ता निश्चित केली जाईल. अर्ज भरल्यानंतर उमेदवाराने धारण केलेल्या अर्हतेमुळे किंवा सादर केलेल्या गुणवत्तेमध्ये बदल केला जाणार नाही. |
| | २०.६ | | एकाच वेळी उमेदवाराला एकापेक्षा अधिक महाविद्यालयात प्रवेश घेता येणार नाही. अशाप्रकारे प्रवेश घेणाऱ्या उमेदवारास प्रवेश प्रक्रियेतून बाद करण्यात येईल. |
| | | **विशेष सूचना:** | |
| | | | I. उमेदवाराने ऑनलाईन भरलेली माहिती केंद्रीय प्रवेश समितीमार्फत तपासली जात नाही.<br>II. उमेदवारांनी भरलेली माहिती व त्यांनी दर्शविलेल्या गुणाच्या आधारे निश्चित झालेल्या गुणवत्तेनुसार तात्पुरता प्रवेश झाल्यानंतर प्रवेशित महाविद्यालयांमार्फत ही माहिती तपासली जाईल.<br>III. उमेदवाराने भरलेल्या माहितीच्या आधारे व त्याने दर्शविलेल्या गुणांच्या आधारे गुणवत्तेनुसार प्रवेश दिले जातात. महाविद्यालयात प्रवेश अंतिम करतांना उमेदवाराने अर्जात नमुद केलेल्या माहितीनुसार पात्रता/गुणात किंवा इतर बाबींमध्ये काही त्रुटी/उणिवा/चूका आढळल्यामुळे प्रवेश रद्द झाल्यास ही सर्वस्वी उमेदवाराची जबाबदारी राहील. |

| | | | |
|---|---|---|---|
| २१ | **शिक्षणशास्त्र महाविद्यालयाच्या निश्चितीबाबत :** | | |
| | २१.१ | | उमेदवारांची गुणवत्ता, विविध अध्यापन पध्दतीसाठी शिक्षणशास्त्र महाविद्यालयातील जागांची उपलब्धता, माध्यम व इतर बाबी विचारात घेऊन गुणवत्तेनुसार उमेदवाराने दिलेल्या प्राधान्यक्रमानुसार महाविद्यालयात संगणकामार्फत तात्पुरता प्रवेश दिला जाईल. |
| | २१.२ | | उमेदवाराचा तात्पुरता प्रवेश निश्चित करीत असतांना प्रथम सामान्य गुणवत्ता यादीतून (**General Merit List)** जागा भरण्यात येतील. त्यानंतर मागासवर्गीय संवर्गाच्या जागा भरल्या जातील. मागासवर्गीय उमेदवार सामान्य गुणवत्ता यादीतून (**General Merit List)** गुणवत्तेनुसार प्रवेशास पात्र राहतील. |
| | २१.३ | | गुणवत्तायादीनुसार प्रवेश प्रक्रिया राबविल्यानंतर जर कोणत्याही मागासवर्गीय प्रवर्गासाठी आरक्षित जागा रिक्त राहिल्यास त्यावर विशेष मागास वर्ग (SBC) उमेदवार जास्तीत जास्त २ टक्के इतक्या जागांवर गुणवत्तेनुसार प्रवेशास पात्र असतील. |
| | २१.४ | | केंद्रीय प्रवेश प्रक्रियेच्या तात्पुरत्या प्रवेश निश्चितीनंतर संबंधित महाविद्यालय प्रमाणपत्राची छाननी करेल. या छाननीमध्ये गुणांत/जातीच्या संदर्भात/पात्रतेच्या संदर्भात त्रुटी आढळल्यास व तपासणीअंती सिध्द झाल्यास तात्पुरता प्रवेश महाविद्यालयामार्फत लेखी कारण देऊन रद्द केला जाईल. त्यामुळे केंद्रीय प्रवेश प्रक्रियेतून देण्यात आलेला तात्पुरता प्रवेश अंतिम मानन्यात येऊ नये. |
| | २१.५ | | मागासवर्गीय प्रवर्गातील काही जागा रिक्त राहिल्यास त्या खालील गटातील अंतर्गत बदलाने भरल्या जातील. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| गट १ | i) | अनुसूचित जाती व नवबौध्द (SC) | ii) | अनुसूचित जमाती (ST) | |
| गट २ | i) | विमुक्त जाती (VJ) (अ) | ii) | भटक्या जमाती (NT १) (ब) | |
| गट ३ | i) | अ भटक्या (जमाती (NT २) (क) | ii) | भटक्या जमाती (NT३ ) (ड) | |
| | | ब) इतर मागासवर्गीय जाती (OBC) | | | |

| | | | |
|---|---|---|---|
| | २१.६ | | २१.५ प्रमाणे बदल करुनही मागासवर्गीय संवर्गाच्या जागा रिक्त राहिल्यास त्या सर्व मागासवर्गीय उमेदवरांमधून एकत्रित गुणवत्तेनुसार भरल्या जातील. |
| | २१.७ | | अ) यानंतरही जागा रिक्त राहिल्यास त्या खुल्या संवर्गातील उमेदवारांमधून गुणवत्तेनुसार भरल्या जातील. |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | ब) २ टक्क्यांमधून जागा रिक्त राहिल्यास त्यांचा समावेश २८ टक्क्यांमध्ये संवर्गनिहाय/विषयनिहाय करुन भरण्यांत येतील. तसेच २८ टक्क्यांच्या पुरेशा जागा उपलब्ध न झाल्यास त्या संवर्गनिहाय व विषयनिहाय ७० टक्क्यांमधून भरण्यांत येतील. |
| | २१.८ | | विषयांच्या विहित जागा रिक्त राहिल्यास पुढीलप्रमाणे बदल करुन प्रवेश देण्याचे अधिकार प्रवेश समितीला असतील : |
| | | I) | एखाद्या संवर्गाच्या एखाद्या विषयात राखीव महिला कोटयात त्या संवर्गाच्या पुरेशा महिला उमेदवार उपलब्ध नसतील तर त्या रिक्त जागा त्याच संवर्गातील त्याच विषयाच्या जनरल मेरीटमधून भरण्यात येतील. |
| | | II) | भाषा विषयांतर्गत बदल. |
| | | III) | कृषी / वैद्यकीय व विज्ञान विषयाअंतर्गत बदल. |
| | | IV | संगणक / माहिती तंत्रज्ञान / अभियांत्रिकी व गणित विषयांतर्गत बदल. |
| | | V | विज्ञान/गणित विषयांतर्गत बदल. |
| | | VI | या बदलानंतरही भाषा, विज्ञान, गणित, वाणिज्य यांच्या जागा रिक्त राहिल्या तर त्या इतिहास, भूगोल, सामाजिक शास्त्र विषयाच्या विहित टक्केवारीनुसार विभागून देण्यात येतील. |
| | | VII | इतिहास व भूगोल विषयांतर्गत बदल यात जागा शिल्लक राहिल्या तर सामाजिक शास्त्र अध्यापन पध्दतीस देण्यात येतील. |
| | | VIII | या सर्व बदलानंतरही जागा रिक्त राहिल्यास सर्व विषयांच्या एकत्रित गुणवत्ता यादीतून प्रवेश दिला जाईल. |
| | | IX | यानंतरही जागा रिक्त राहिल्यास माध्यम बदलून उमेदवाराने दिलेल्या पात्र ) माध्यमानुसारप्रवेश दिला जाई ( |
| | | | **स्पष्टीकरण:** एखाद्या संवर्गाच्या एखाद्या विषयात राखीव महिला कोटयात त्या संवर्गाच्या पुरेशा महिला उमेदवार उपलब्ध नसतील तर त्या रिक्त जागा त्याच संवर्गातील त्याच विषयाच्या जनरल मेरीटमधून भरण्यात येतील. |
| २२ | **प्रवेशित उमेदवारांच्या महाविद्यालय अदलाबदलीबाबत :** | | |
| | २२.१ | | प्रवेशित उमेदवारांची कोणत्याही परिस्थितीत परस्पर अदलाबदल (Mutual Transfer) केली जाणार नाही. तथापि, अपवादात्मक परिस्थितीत मा.संचालक (उच्च शिक्षण) यांच्या मान्यतेने |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | महाविद्यालय सुरु होण्यापूर्वी १५ दिवसांच्या आत व जर महाविद्यालय सुरु झाल्यानंतर प्रवेश मिळाला असल्यास ८ दिवसांच्या आत अशी अदलाबदल करता येईल. यासाठी संबंधित उमेदवारांनी खालील पध्दती अवलंबवावी : |
| | २२.२ | | शिक्षण संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या नांवे राष्ट्रीयकृत बँकेचा पुणे येथे देय असणारा रु.१०००/- चा धनाकर्ष (Demand Draft) काढावा. |
| | २२.३ | | शिक्षण संचालनालय (उच्च शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे येथील बी.एड. कक्षात विहित नमुन्यात विहित वेळेत धनाकर्षासह प्रत्यक्ष अर्ज सादर करावा. |
| | २२.४ | | बदली उमेदवाराचा शोध स्वत: बदली आवश्यक असलेल्या उमेदवाराने घ्यावा. ही बदली मागणाऱ्या उमेदवाराची जबाबदारी आहे. |
| | २२.५ | | अदलाबदली करणारे दोन्ही उमेदवार एकच संवर्ग/अध्यापन पद्धती/माध्यम/कोट्यातील असावेत. |
| | २२.६ | | संबंधित दोन्ही महाविद्यालयांच्या प्राचार्यांचे ना-हरकत प्रमाणपत्र अर्जासोबत जोडणे आवश्यक आहे. |
| | २२.७ | | अदलाबदल ही विशेष तरतुद आहे, तो हक्क नाही याची नोंद संबंधित उमेदवारांनी घ्यावी. |
| **२३** | **तात्पुरत्या प्रवेशाची अंतिम प्रवेश निश्चिती :-** | | |
| | २३.१ | | उमेदवाराने भरलेल्या अर्जाची केंद्रीय प्रवेश प्रक्रिया समितीद्वारा छाननी/तपासणी केली जात नाही. त्यामुळे केंद्रीय प्रवेश प्रक्रियेद्वारा देण्यात आलेले तात्पुरते प्रवेशपत्र अंतिम प्रवेशपत्र म्हणून ग्राह्य धरले जाणार नाही. केंद्रीय प्रवेश प्रक्रियेद्वारा देण्यात आलेल्या तात्पुरत्या प्रवेशपत्राच्या आधारे संबंधित महाविद्यालयाने उमेदवारांच्या बी.एड. प्रवेशासाठी आवश्यक प्रमाणपत्रांची व गुणवत्तेची छाननी करुन पात्र असल्यास निर्धारित शुल्क विहित वेळेत भरल्यानंतर प्रवेश अंतिम केला जाईल. केंद्रीय बी.एड प्रवेश नियमावली व संबंधित विद्यापीठाचे बी.एड. अभ्यासक्रमासंबंधीचे पात्रतेचे निकष यांच्या आधारे उमेदवाराचा प्रवेश अंतिम करण्याची जबाबदारी संबंधित अध्यापक महाविद्यालयाच्या प्राचार्यांची राहील. |
| | २३.२ | | उमेदवाराने खालीलपैकी कोणतीही माहिती चुकीची भरल्याचे महाविद्यालयाच्या निदर्शनास आल्यास प्रवेश नाकारण्यात येईल.<br>अ) पदवी तीन वर्षाची, ब) किमान पात्रता गुण (टक्केवारी) पदवी किंवा पदव्युत्तर, क) किमान सी.ई.टी. गुण, ड) योग्य नमुन्यातील अनुभव प्रमाणपत्र व नियम **२.१**(ब) मधील नमूद |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | केलेली सहपत्रे, इ) संवर्ग, ई) विषय/अध्यापन पध्दती, फ) माध्यम, ग) कोटा, ह) विद्यापीठनिहाय प्रवेश पात्रता. |
| | २३.३ | | खालील प्रमाणपत्रे सादर न केल्यासही प्रवेश नाकारण्यात येईल :<br>अ) सी.ई.टी. गुण पत्रिका,<br>ब) अध्यक्ष, केंद्रीय प्रवेश समिती यांच्या सहीचे तात्पूरते प्रवेशपत्र,<br>क) गुणवत्तेसाठी ग्राह्य धरलेल्या गुणांसाठीची आवश्यक मुळ गुणपत्रके व प्रमाणपत्रे,<br>ड) संवर्गाच्या लाभासाठी शासनाच्या निर्णयानुसार आवश्यक सर्व प्रमाणपत्रे,<br>इ) अपंग, आजी-माजी सैनिक, प्रकल्पग्रस्त, भूकंपग्रस्त, परित्यक्ता, घटस्फोटीत महिला, विधवा व संबंधित सवलती असल्यास त्याबाबतचे प्रमाणपत्र,<br>ई) इंग्रजी माध्यमाच्या प्रवेशासाठी इंग्रजी भाषा ज्ञान चाचणी गुणपत्रिका.<br>वरील बाबींपैकी काही उणीवा/त्रुटी/चुकीची माहिति किंवा प्रमाणपत्रांची कमतरता यामुळे महाविद्यालयात प्रवेश नाकारला जाईल व याबाबतची जबाबदारी सर्वस्वी उमेदवाराची राहील. |
| **२४** | **शुल्क परतावा :** | | |
| | २४.१ | | अ) प्रवेश अंतिम झाल्यानंतर व प्रत्यक्ष विद्यापीठाच्या वेळापत्रकानुसार अभ्यासक्रम सुरु होण्यापूर्वीच्या कालावधीमध्ये उमेदवाराने कोणत्याही कारणास्तव प्रवेश रद्द केल्यास महाविद्यालयास शुल्कामधून फक्त रु.१०००/- कपात करता येईल.<br>आ) अभ्यासक्रम सुरु झाल्यानंतर प्रवेशित विद्यार्थ्याने ८ दिवसांच्या आत स्वत: प्रवेश रद्द केल्यास १० टक्के कपात करता येईल.<br>इ) ९ ते १५ दिवसांच्या आत प्रवेश रद्द केल्यास २० टक्के कपात करता येईल.<br>ई) १६ ते ४५ दिवसांत रद्द केल्यास ५० टक्के शिक्षण शुल्क कपात करता येईल.<br>उ) ४५ दिवसानंतर प्रवेश रद्द केल्यास कोणतेही शुल्क परत दिले जाणार नाही. |
| | २४.२ | | विद्यापीठ पात्रतेमुळे किंवा प्रवेश पात्रतेमुळे समितीद्वारा प्रवेश रद्द झाल्यास उमेदवारास संपूर्ण शुल्क परत करणे महाविद्यालयावर बंधनकारक राहील. |
| | २४.३ | | प्रवेशित विद्यार्थी विद्यापीठाच्या वेळापत्रकानुसार महाविद्यालय सुरु झाल्यापासून सतत आठ दिवस काहीही न कळवता गैरहजर राहिल्यास त्याचा प्रवेश आपोआप रद्द होईल व कोणत्याही सबबीवर शिक्षण शुल्क परत केले जाणार नाही. उमेदवाराचा अंतिम प्रवेश |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | होऊन उमेदवार महाविद्यालयात उपस्थित झाल्यानंतर गैरहजर असल्यास महाविद्यालयाने विद्यापीठ नियमाप्रमाणे कार्यवाही करावी. |
| | २४.४ | | **मूळ कागदपत्रे महाविद्यालयाकडे ठेवण्याबाबत :** कोणत्याही उमेदवाराचे मूळ कागदपत्र अंतिम प्रवेशाच्या तपासणीनंतर महाविद्यालयाला स्वत:कडे जमा करुन ठेवता येणार नाहीत; तथापि, विद्यापीठ पात्रतेसाठी / केंद्रीय प्रवेश प्रक्रियेकडे तपासण्याच्यावेळी / प्रवेश नियंत्रण समितीच्या तपासण्याच्यावेळी मूळ प्रमाणपत्रे उमेदवारास महाविद्यालयामार्फत सादर करावी लागतील. |
| **२५** | **कवि कुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय संस्कृत विद्यापीठ, रामटेक :** | | |
| | २५.१ | अ) | **प्रवेशपध्दती :** महाराष्ट्र शासनाच्या सत्र २०१५-१६ च्या सीईटी परीक्षेचा निकाल लागल्यावर कवि कुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालयातर्फे महाराष्ट्रातील सर्व प्रमुख वर्तमानपत्रात प्रवेशासाठी जाहिरात दिली जाईल. ही जाहिरात www.sanskrituni.net या विश्वविद्यालयाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द केली जाईल. त्या जाहिरातीत विश्वविद्यालयाशी संलग्नित प्रवेश योग्य महाविद्यालयांची नावे अर्जदाराने पसंतीक्रम दर्शविण्यासाठी नमूद केली जातील. राज्याच्या माध्यमिक बोर्डाची १० व्या वर्गाची परीक्षा संस्कृत विषय घेऊन उत्तीर्ण असलेल्या किंवा याहून वरच्या वर्गाची/स्तराची परीक्षा संस्कृत विषय घेऊन उत्तीर्ण असलेल्या आणि सीईटी उत्तीर्ण असलेल्या विद्यार्थ्यांनी प्रवेशासाठी विश्वविद्यालयाने दिलेल्या नमुन्यात अर्ज करावा. अर्जाचा नमुना विश्वविद्यालयाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असेल. त्यानंतर विश्वविद्यालयाने जाहिरात दिलेल्या प्रवेश वेळापत्रकानुसार प्रवेश केले जातील. ही संपूर्ण प्रवेश प्रक्रिया प्रत्येक टप्प्यानुसार संकेतस्थळावर उपलब्ध असेल. |
| | | ब) | बी.एड. चे सर्व प्रवेश विश्वविद्यालयाच्या केंद्रीय प्रवेश समितीद्वारे केले जातील. |
| | २५.२ | | **कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालयाच्या बी.एड प्रवेशाची अर्हता :** ज्याने महाराष्ट्र शासनाची बी.एड. प्रवेशासाठी असलेली सीईटी परीक्षा सत्र २०१५-१६ च्या बी.एड. प्रवेशासाठी उत्तीर्ण केली असेल व कोणत्याही विद्याशाखेचा पदवीधर, ज्याने राज्याच्या माध्यमिक बोर्डाची १० व्या वर्गाची परीक्षा संस्कृत विषय घेऊन उत्तीर्ण केली आहे किंवा याहून वरच्या वर्गाची/स्तराची परीक्षा संस्कृत विषय घेऊन उत्तीर्ण केली आहे असा अर्हताधारक अर्जदार पात्र राहील. |

२५.३ **कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालयातंर्गत अध्यापक महाविद्यालये व उपलब्ध जागा :**

| क्र. | महाविद्यालयाचे नांव | प्रवेश क्षमता |
|---|---|---|
| १ | कालिदास विश्वविद्यालयाचे अध्यापक महाविद्यालय, कस्तुरबा भवन, बजाज नगर, नागपूर. | १०० |
| २ | कीर्तनकेसरी भाऊसाहेब शेवाळकर शिक्षाशास्त्री महाविद्यालय, सीकढी.एम. शैक्षणिक परिसर, परतवाडा, जि.अमरावती. | १०० |
| ३ | श्रीमती शकुंतला नरगुंदकर महिला शिक्षणशास्त्री महाविद्यालय, देवनगर, खामला, नागपूर. | १०० |
| ४ | कृष्णाजी जोशी शिक्षाशास्त्री महाविद्यालय, तिरुपती तंत्रनिकेतन, केशव नगर, अकोला. | १०० |
| ५ | रामकृष्ण शिक्षाशास्त्री महाविद्यालय, उत्तम नगर, अमरावती. | १०० |
| ६ | स्वर्गीय रामरावजी दुधे अध्यापक महाविद्यालय, दारव्हा, जि.यवतमाळ. | १०० |

उपरोक्त बी.एड महाविद्यालयातील एकूण ६०० जागा प्रवेश घेण्यासाठी उपलब्ध आहेत. येथे इतर बी.एड. अभ्यासक्रमांमध्ये उपलब्ध १६ अध्यापन पध्दती निवडीसाठी उपलब्ध आहेत. विश्वविद्यालयाच्या परीक्षेसाठी मराठी, हिंदी, इंग्रजी, संस्कृत यापैकी कोणतेही माध्यम घेता येईल. कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालयाद्वारे स्वत:ची गुणवत्ता यादी आणि प्रवेश स्वतंत्रपणे केंद्रीभूत पध्दतीने विश्वविद्यालयाकडूनच केले जातील. या विश्वविद्यालयाने त्यांच्या नियमाप्रमाणे पात्रता पडताळून गुणवत्तेप्रमाणे प्रवेश द्यावयाचे आहेत. यामध्ये ९८ टक्के कोटा हा महाराष्ट्रासाठी व २ टक्के कोटा महाराष्ट्राबाहेरील उमेदवारांसाठी आहे. सदर प्रवेश कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय यांनी तयार केलेल्या निर्णयानुसार देण्यात येतील. रिक्त राहिलेल्या जागा उपलब्धतेनुसार महाराष्ट्रातील किंवा बाहेरील अर्जदारांमधून भरण्यात येतील.

२६ **एस.एन.डी.टी.महिला विद्यापीठ :**

या विद्यापीठाच्या शिक्षणशास्त्र महाविद्यालयात ७० टक्के जागांसाठी एस.एन.डी.टी.ची अध्यापक महाविद्यालये ज्या विभागक्षेत्रात येतात त्या विभागक्षेत्रातील त्या महाविद्यालयातील प्रवेशासाठी एस.एन.डी.टी. विद्यापीठाच्या ज्या पात्र उमेदवारांनी त्या महाविद्यालयासाठी

| | | | |
|---|---|---|---|
| | | | अर्ज केला आहे, त्यांना गुणवत्तेनुसार प्रथम प्रवेश दिला जाईल व उरलेल्या जागा त्या त्या विभागातील महिला उमेदवारांतून गुणवत्तेनुसार भरण्यात येतील. |
| २७ | **अपंगाचे शिक्षक म्हणून काम करण्यासाठी विशेष- बी.एड.अभ्यासक्रम ( B.Ed Special Education) :** | | |
| | विशेष शिक्षण म्हणजे कर्णबधिर, अंध, मतिमंद, अध्ययन अक्षमता असणारे, अस्थिव्यंग व मेंदूसंबंधित दुर्बलता असणाऱ्या विशेष शैक्षणिक गरजा असणाऱ्या विविध प्रकारच्या अपंग मुलांचे शिक्षण. हे शिक्षण अपंगाच्या विशेष शाळेत, सर्वसाधरण मुलांच्या शाळेत, समावेशित शिक्षणांतर्गत सर्व शाळांमध्ये प्रवेश दिलेल्या अपंगांना त्यांच्या गरजांनुसार दिले जाते.<br>नवीन विचारधारेनुसार आता या मुलांना अपंग असे संबोधले जात नाही. ह्या सर्व मुलांना आता "विशेष गरजा असलेली मुले" असे संबोधले जाते. या मुलांचे शिक्षण, विशेष शिक्षणासाठी प्रशिक्षित शिक्षकांशिवाय होऊ शकत नाही. हे विशेष शिक्षण प्रशिक्षण ज्या महाविद्यालयात दिले जाते, त्या महाविद्यालयांना "विशेष शिक्षण अध्यापक महाविद्यालये" असे म्हणतात. ही महाविद्यालये विविध प्रकारच्या विशेष गरजा असलेल्या मुलांसाठी विशेष शिक्षक तयार करतात. या महाविद्यालयांत वेगवेगळ्या प्रकारचे अपंगत्व असलेल्या मुलांना शिकविण्यासाठी प्रशिक्षित शिक्षक तयार केले जातात. भारतीय पुनर्वास परिषद (RCI), नवी दिल्ली यांच्याद्वारे या प्रशिक्षणासाठी अभ्यासक्रम ठरविला जातो. या महाविद्यालयांची विद्यार्थी संख्या, प्रवेशाचे निकष यांना भारतीय पुनर्वास परिषदेची मान्यता असते. भारतीय पुनर्वास परिषदेच्या केंद्रीय नोंदणी रजिस्टर (CRR) मध्ये नाव नोंदवल्याशिवाय कोणतीही व्यक्ती व मान्यतेशिवाय कोणतीही संस्था या क्षेत्रात काम करु शकत नाही. या क्षेत्रात बी.एड. केल्याने आता अनेक ठिकाणी रोजगाराच्या संधी उपलब्ध होत आहेत.<br>**१.** हे प्रशिक्षण पूर्ण झाल्यावर शिक्षक समावेशित शिक्षणातील युनिटमध्ये काम करु शकतात. **५** अपंग मुलांमागे एका शिक्षकाची नियुक्ती शाळेतील युनिटमध्ये केली जाते.<br>१.१) युडीआयएसई अहवाल महाराष्ट्र शासन २०१२-१३ नुसार ईयत्ता ९ वी ते १२ वी वर्गामध्ये ३४४३५ विशेष गरजा असलेल्या विद्यार्थ्यांनी प्रवेश घेतला आहे. महाराष्ट्रात त्यासाठी केवळ ३०० शिक्षक विशेष शिक्षण पदवीधारक नियुक्त केले आहेत. वरील आकडेवारीनुसार माध्यमिक, उच्च माध्यमिक स्तरावर विविध प्रकारच्या अपंगांना शिकविण्यासाठी ६५०० प्रशिक्षित शिक्षकांची आवश्यकता आहे.<br>**२.** हे प्रशिक्षण पूर्ण झाल्यावर सर्व शिक्षा अभियानांतर्गत समावेशित शिक्षणात विशेष शिक्षक / फिरते शिक्षक म्हणून काम करता येते. महाराष्ट्रातील शासकीय व अशासकीय संस्थांमध्ये ७०७७६ (युडीआयएसई अहवाल-महारष्ट्र शासन २०१२-१३) विशेष गरजा असलेल्या मुलांनी ६ वी ते ८ वी या वर्गांमध्ये प्रवेश | | | |

| | |
|---|---|
| | घेतला असून सर्व शिक्षा अभियानांतर्गत या मुलांना शिकविण्यासाठी ७७०० शिक्षकांची आवश्यकता आहे. महाराष्ट्र शासनाने यापैकी केवळ १००० बी.एड विशेष शिक्षण पदवीधारक शिक्षकांची नियुक्ती केली असून विद्यार्थी संख्येनुसार ६७०० जागा भराव्या लागणार आहेत.<br>**३.** राष्ट्रीय शिक्षण मोहिमेअंतर्गत लवकरच विषयतज्ञ, विशेष शिक्षक, रिसोर्स टिचर म्हणून या विशेष शिक्षकांची नियुक्ती केली जाणार आहे. त्यामुळे या शिक्षकांची अधिक गरज आहे.<br>**४.** हे प्रशिक्षण घेऊन विशेष शाळेत विशेष शिक्षक म्हणूनही काम करता येते. महाराष्ट्रात ६२ अंधांच्या, ३८३ कर्णबधिरांच्या, ६६२ मतिमंदांच्या, ३१९ अस्थिव्यंग मुलांच्या, २० शासकीय संमिश्र केंद्र अशा एकूण १४४६ विशेष शाळांमध्ये विशेष शिक्षक म्हणून रोजगाराच्या संधी उपलब्ध आहेत.<br>**५.** याशिवाय बी.एड. नंतर विशेष शिक्षण पदविका स्तरावर अधिव्याख्याता म्हणून काम करता येते.<br>**६.** अपंगांचे विशेष ट्युशन क्लासेस घेता येतात.<br>**७.** महाराष्ट्रात बी.एड विशेष शिक्षण पदवी देणारी ३१ महाविद्यालये असून प्रत्येकी फक्त २५ प्रवेशक्षमता असून**,** प्रतिवर्षी फक्त ७७५ विशेष शिक्षक प्रशिक्षित होऊ शकतात.<br>याशिवाय सरकारच्या (CBR) समुदायाधारीत पुनर्वसन कार्यक्रमात अनेक रोजगाराच्या संधी उपलब्ध होऊ शकतात.<br>**सुचना: या अभ्यासक्रमासाठी इच्छुक उमेदवारांनी अर्जात स्वतंत्र नोंद करावी.** |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०६१५३६२२४००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Urmila Vaibhav Joshi

Digitally signed by Urmila Vaibhav Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Urmila Vaibhav Joshi
Date: 2015.06.06 15:40:04 +05'30'

**( उर्मिल जोशी )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,

२. सर्व सहसंचालक, उच्च शिक्षण, विभागीय कार्यालय,

३. कुलसचिव, महाराष्ट्रातील सर्व अकृषि विद्यापीठे,

४. सदस्य सचिव, प्रवेश नियंत्रण व शिक्षण शुल्क समिती, शासकीय तंत्रनिकेतन, खेरवाडी, वांद्रे (पूर्व ), मुंबई,

५. सचिव, विना अनुदानित अध्यापक महाविद्यालये संस्था चालक असोसिएशन, १५ शार्दुल अपार्टमेंटस्, जुना टोल नाका, मुंबई बायपास, उत्सव मंगल कार्यालयाजवळ, वडगांव (बुद्रुक), पुणे-४०० ०४१,

६. निवड नस्ती (मशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.